॥ ॐ ॥

# ॥ ब्रम्हस्मृती ॥

महाराष्ट्र आणि हिंदी भाषेंत :

अव्रानी भाषेचा तरजूमा उपासनेचा.

श्रीमंत माहाराज शाहाजी प्रतापसिंह माहाराज सातारकर अध्यक्ष कर्छीसमाज यानीं ग्रंथ केला तो.

॥ सत्यमेव जयंते ॥




पुणें पेठ बुधवार येथें.
भाऊ गोविंद सापकर यांचे 'ज्ञानचक्षु' छाप० छापिलें.



आवृत्ति १ ली.
ब्रह्मसमत् १४ विक्रम सं० १९३९ सन १८८३.

किंमत १॥४.

# साधारण उपासनेचा वीधी.

ज्या कोणास विद्या नसेल मग ब्राह्म असो अथवा ब्राह्मी असो त्यास अवश्यमेव उपासना कर्म असलें पाहिजे. कारण उन्नती होणें हें उपासनेचेंच फळ आहे. केवळ ब्राह्मण ह्मणण्यांत उन्नती होणार नाहीं, सबब अवश्यमेव उपासना शिकविली पाहिजे. या ग्रंथांतून कोणती हें सांगतों.

## मूळ मंत्र.

## ॐ सत्यं ब्रह्म कृपाहि केवलं तवनाम निर्मलं.

### प्राथःकाळ, सायंकाळ, निद्रासमय.

| पृष्ठ. | अध्याय. | उपासना. | |
|---|---|---|---|
| ३९ | ६ | पद | प्रत्येक पद ह्मणून नमस्कार करीत जावा. |
| | ६ | पद. | |
| २६ | ६ | पद. | |
| ३२ | ९ | पद. | |
| ७२ | १३ | पद. | हें बहुशा शयन समयीं ह्मणावें. |
| १९२ | | | |

ही सर्व उपासना झाल्यानंतर मूळ मंत्राचा १०१ वेळ जप करावा. त्यानंतर अध्याय १४ तील पृष्ठ १९९ यांतील उपासना करावी. अगर हिंदी भाषा जाणणाऱ्यास याचप्रमाणें कांहीं हिंदी पदें शिकवावीं.

पद.

बा करी त्वरेनें सार्थकया जन्माचें । जों नाहीं बलावणें आलें यमाचें ॥ ध्रु० ॥ देह दुर्लभ नाहीं पुनः मिळायाचा । दरवाजा

जो निज सुख धामाचा ॥ बा० ॥ हा कल्पद्रुम कल्पिलाच देहाचा । तरि शाश्वत नोहे पळांत जाग्राचा ॥ बा० ॥ घडी येतां काळामुखीं पडायाचा । जरि ह्मणाशि धांव तरि नाहीं रहायाचा ॥ बा० ॥ संपत्ति नकोही उधळूं फुकाची । पुढें होईल दुर्धर गतरे जिवाची ॥ बा० ॥ अनुतापाग्निमधीं पोळशी उगाची । झडकरी करावें साधन स्वहिताचें । जों नाहीं बलावणें आलें यमाचें ॥ बा करी० ॥ १ ॥

---

# अनुक्रमणिका.

## अनुक्रमणिका.

## ॐ एको ब्रह्मद्वितीयो नास्ती.

### प्रस्तावना.

ईश्वर एक आणि अनादी सर्व शक्तिमान असा जो सत्याचा जय करणारा आणि असत्याचा नाश करणारा याला मी अनेक भावें शरण जाऊन प्रार्थना करतों कीं, तो आपले शक्तीनें व कृपेनें या ग्रंथास आश्रय देऊन शेवटास नेवो.

### ग्रंथकर्त्याची विनंती.

हा ग्रंथ आमचे महाराष्ट्र आणि हिंदी बंधुजनांचे योग्य उपयोगी यावा या हेतूनें केला आहे. या ग्रंथांत मुख्य ब्राह्मो धर्माचीं तत्वें, दुसरें नित्य नैमित्तीक कर्म, तिसरी उपासना, कथा वगैरे स्फुट विषय, याप्रमाणें ठेविले असून केवळ संस्कृत जाणणारे

व हिंदी जाणणारे व महाराष्ट्र जाणणारे या तिघांचे उपयोगी उपासना यावी असे योजनेनें हा ग्रंथ करून आपले बंधुजनांस नजर केला आहे. या ग्रंथाचें नांव ब्रह्मस्मृती असें ठेविलें आहे.

---

ग्रंथकर्त्याचा हेतु.

मी देश पर्यटन करीत असतां एकंदर उपासना नित्य नैमित्तीक याचें उत्तम साधन गुजराथ देशांत आमचे मित्र महिपतराम रुपराम यानीं प्रार्थनामाला नांवाचें पुस्तक केलें आहे तें उत्तम आहे. व तेथें उपासना त्याच पुस्तकावरून करण्याची चाल आहे. बाकी सर्व मंदिरांत बहुशः आटकळ पंचविशीनेंच उपासना करतात, तर तसें नसावें या हेतूनें हा ग्रंथ केला, जो आमचे बंधुजनांचे उ-

चेंच आंग आहे. व या ग्रंथांत तीन आंगें आहेत. एक उपासना, दुसरें व्याख्यान, तिसरें धर्मतत्व अशीं तीन आंगें आहेत. आतां आमचे प्रिय बंधु या ग्रंथाचा उपयोग करतील अशी विनंती करून ग्रंथास आरंभ करतों.

---

ग्रंथ आरंभ.

## ब्रह्मयानें जग उत्पन्न केलें त्याचें वर्ण.

पूर्वीं या जगांत केवळ आंधार होता. त्यास इच्छा झाली कीं, जग उत्पन्न करावें त्यावरून त्यानें इच्छेनें पाणी उत्पन्न केलें, त्यानंतर त्यापासू-

न सर्व सृष्टी उत्पन्न केली, त्यानंतर निरनिराळे जातीचीं जनावरें उत्पन्न केलीं वचन.

श्लोक.

सोऽभिध्याय शरीरात्स्वा त्सि-
सृक्षुर्विविधाः प्रजाः ॥ अपएव
ससर्जादौ तासुबीज मवासृजत॥१॥

भावार्थ.

पूर्ण ब्रह्मने आपने ईच्छासें पानी-को पैदाकिया उससे सारे जगतको उत्पन्न किया ॥ १ ॥

श्लोक.

पशवश्चमृगाश्चैव व्यालाश्चोभ-
यतोदतः ॥ रक्षांसिच पिशाश्च
मनुष्याश्च जरायुजा ॥ २ ॥

भावार्थ.

बाद उसके सबजानावरोंको वैगैरा पईदाकियाथा.

नश्च विहंगमान् ॥ पशुन्मृगा
न मनुष्यांश्च व्यालांश्चो भय
तोदतः ॥ ३ ॥

भावार्थ.

अश्व, वान्नर, मत्स्य, नानाविध पक्षी वगैरे उत्पन्न किया.

सर्व उत्पन्न केल्यानंतर मनुष्यास उत्पन्न केलें त्या मूळ पुरुषाचें नांव मनु. पंचतत्वापासून ह्मणजे अग्नी, वायु, पृथ्वी, पाणी, ईश्वरी तेज, यापासून उत्पन्न केलें. तसेंच त्याचे अर्धशरीर भागांतून स्त्रीस उत्पन्न केलें. याचअन्वयें पंचतत्वापासून सर्वांचाच पिंड होतो. स्त्रीचें नांव सतरुपा.

श्लोक.

द्विधाकृत्वात्मनोदेहमर्धेन पुरु-

षोऽभवत् ॥ अर्धेननारीतस्यां
सविराज मस्त्रजत्प्रभुः ॥ ४ ॥

भावार्थ.

पंचतत्वसे मनुष्यको बनाया उसके शरीरके आर्धभागसे स्त्रीको, जीसका नाम आदम और हावा रखा.

यानंतर असा जो मनु यास ब्रह्मदेव उपदेश धर्माचा करता झाला. तो उपदेश कोणचा हें सांगतों. उपदेश आध्यायांत पुढें सांगितले आहेत. अशी कितीएक समयीं जगाचा लय व उत्पत्ति होत आली आहे.

श्लोक.

मन्वंतराण्यसंख्या निसर्ग ॥
सवंहारयवच ॥ ५ ॥

भावार्थ.

मन्वतरोकां जैसा शुमार नही उसीतरा ईस जगतके पैदाईशका

और नाशका शुमार नही.

ब्रह्मस्मृती सृष्टी उत्पत्ति निरोपणं नाम प्रथम आध्याय समाप्त ब्रह्मार्पणमस्तु.

## धर्म आज्ञा उपासना प्रकार.

जगाचे उत्पत्तीचे समयीं ब्रह्मदेवानें पूर्णब्रह्म याचे आज्ञेनें मनूस धर्म उपदेश केला तो यथासांग सत्यसागर ग्रंथांत निरोपण केलाच आहे. व येथेंही थोडा बहुत करतों- ईश्वर आज्ञा आहे कीं, ॐभुर्भुवस्व:॥ हीं अक्षरें ह्मणून वेदास आरंभ करावा, परंतु या सर्वांचें मूळ ब्रह्म या नांवाचे जपानें व ब्रह्म ज्ञानाच्या उत्कर्षानें मोक्ष प्राप्त होतो यांत संदेह नाहीं. वीना ब्राह्मो ज्ञानाचे मोक्षास दुसरा मार्ग नाहीं.

श्लोक.

ओंकारपूर्विकास्तिस्रो यहाव्या-
हृतयोऽव्ययाः ॥ त्रिपादचैवसा-
वियंब्रह्मणोमुखं ॥ १ ॥

भावार्थ.

ॐभुर्भुवस्वः इससे वेद पाठकरना लेकीनाविना ब्रह्मके जपसे और ब्राह्मो ज्ञानसेही मोक्ष प्राप्त होगा इसमे संदेहे नही.

ब्राह्मो यांचें मत आहे कीं. उपासना विना यज्ञयागादी सर्व कर्मे व्यर्थ आहेत. एक उपासना करणेंच योग्य आहे. व ब्राह्मो ज्ञान हेंच मुख्य तत्व आहे असा जो ब्राह्मोचा नेम आहे. तसेंच एक ईश्वर उपासनेस योग्य आहे. यावांचून अन्य देवांची उपासना करूं नये हें ब्राह्मोचें जें मत आहे त्याविषयीं प्रमाण.

श्लोक.

क्षरंतिसर्वा वैदिकयोजुहोति य-
जतिक्रिया ॥ अक्षरं दुष्करंज्ञेयं
ब्रह्मचैव प्रजापतिः ॥ २ ॥

भावार्थ.

वेदके विहितभी जो यागादी कर्म स्वतः नाशवंत है. और उसके फलही नाशवंत है. और उपासना या जप ये नाशवंत नही. सबबकी ब्रह्महो नाशवंत नही. इसकारणसें उसका फल अविनाशी है. इसवास्ते एक ब्रह्मकी उपासनाही योग्य है.

उपासना तीन प्रकारची आहे. एक कुटुंबी, एक सामाजिक, आणि एक निर्ज्जन याप्रमाणें तीन प्रकारची उपासना आहे. उपासनेच्या वेळा चार आहेत. एक प्रातःकाळ, स्नानानंतर, सायंकाळ, रात्रौ निद्रा समयीं, निर्ज्जन उपासना रात्रौ बारानंतर

अथवा तीन वाजल्यापासून सूर्यो-
दया पावेतों. येणेंप्रमाणें वेळा जा-
णाव्या. सामाजिक उपासनेस वेळ
जी सर्वांचे मतें नेमली जाईल तीच
योग्य जाणावी. उपासनेचीं आंगें,
कुटुंबी उपासनेचीं पांच आंगें जा-
णावीं. ध्यान, स्तुति, धन्यवाद, धर्म-
पुस्तकाचा पाठ, पापक्षमा हीं पांच
आंगें जाणावीं. सामाजिक उपास-
नेंत सहा आंगें असावीं. पूर्वीचीं
आंगें पांच व एक व्याख्यान एकूण
सहा आंगें. निर्ज्जन उपासनेत तीन
आंगें—एक ध्यान, धर्मपुस्तकाचा
पाठ, जप अशीं तीन आंगें जाणा-
वीं. ईश्वर प्राप्तीस निर्ज्जन उपासना
अवश्यमेव असली पाहिजे. उपा-
सनेचें स्थान पवित्र, सुगंधी, सुशो-
भित पुष्पानें वगैरे असावें. निर्ज्जन

उपासनेस एकांतस्थान असावें. उपासनांचा सर्व प्रकार पुढें येणार आहे.

श्लोक.

विधियज्ञाज्जपयज्ञो विशिष्टो दशभिर्गुणैः ॥ उपांशुस्याच्छ तगुणः साहस्त्रोमानसः स्मृतः ॥ ३ ॥

भावार्थ.

सबसे निर्ज्जन उपासनाका फल ज्यादा है. यानें जपयज्ञ जाना.

गृहस्थ आश्रमांत जे ब्राह्मोज्ञानी आहेत ते बाह्यातकारी कोणचेंही कर्म करीत नाहींत. जे ज्ञानी आहेत ते दांभिक कर्म करीत नाहींत.

श्लोक.

यतानेकेमहायज्ञान् यज्ञशास्त्रविदोजनाः ॥ अनीहमानाः सततमिंद्रियेष्वेव जुह्वति ॥ ४ ॥

भावार्थ.

इस संसारमे जो ज्ञानी होकर

ब्रोह्मोज्ञानी हैं व लौकिकार्थ कुछ कर्म नही कर्तें यानें दांभिक कर्म.

ब्रह्मस्मृति उपासना निरोपणं नाम द्वितियो आध्याय ब्रह्मारपणमस्तु.

## कथा.

मूळ ब्राह्मो धर्म मनुपासून आरंभ आहे. मनूचा पुत्र मरीच, मरीचाचा पुत्र आत्री, आत्रीचा पुत्र नेहयो यापासून आरंभ. त्याच वंशांतील पुरुखा याचे वंशांत आयु, याचे वंशांत सुनग याचा पुत्र सुनेक यानें मूळ ऋग्वेद स्थापन केला. व या वेदाचें मूळ नांव रीख असें होतें. सुनग याचे वंशांत गमबीर नामक याचा पुत्र आत्री यानें मूर्तिपूजा स्थापन करून आपले वंशज याचें नांब ब्राह्मण ठेविलें. यावरून हल्लीं ब्राह्मण

प्रसिद्ध करतात कीं, मूळ पुरुष आत्री आहे. याप्रमाणें मूळ सृष्टींत धर्म-भेद झाला व तेणेंकरून सत्य-धर्माचा लय होऊन असत्य अशी जी मूर्तिपूजा याचें प्राबल्य झालें तेणेंकरून सृष्टीचा लय झाला त्या समयांत मनूचे वंशांतून एक स्त्री रा-हिली होती तिचें नांव सुमती मुलगी सरवर सार्वभोम याचा मुलगा दाल-ग्येसु याची ही मुलगी होती. हिस साठ हजार वंशज झाले, त्या का-ळांत सत्यधर्माचा नाश होण्याकरि-तां मरलुथी पुत्र कनु यानें मूर्तिपूजा हा धर्म स्थापन केला. याचप्रमाणें काळाकाळाचे ठायीं होत आलें आहे. जर सर्वलिहिलेंतर ग्रंथकरण्याचाहेतु-कितीएक वर्षानें शेवटास जाणार आहे व अयुष्य क्षणभंगुर या करतां

इकडून लेखणीस उचलून सारांश लिहितों कीं, अखेर यदु मुलगा देवयानीचा. यापासून पुढें ज्या ज्या कथा झाल्या त्यांचें वर्णन होईल. कारण हल्लीं त्यांचेच वंशज आहेत. या कथेनें हें सिद्ध केलें कीं, हा धर्म अनादी आहे. आतां हा धर्म अनादी असून मूर्तिपूजा व ब्राह्मण कोणास ह्मणूं लागले याची कथा पूर्वीं सत्यसागराच्या बाराव्या अध्यायांत पृष्ठ ६० भाग दुसरा यांत आहे ती पहावी ह्मणजे समजेल. याशिवाय हा धर्म अनादी याविषयीं वचनेंसहीत सिद्धांत सत्यसागराचा अध्याय नऊ भाग दुसरा पहा.

ब्रह्मस्मृति ब्राह्मोधर्म अनादी सिद्धांत निरोपणं तृतीयो अध्याय समाप्त ब्रह्मारपणमस्तु.

# नित्य कर्म.

नित्य नैमित्तीक कर्म सांगतों. नित्य कर्म सत्यसागर ग्रंथ याचा अध्याय चवदा भाग दुसरा पहावा. हें नित्य कर्म जाणावें. आतां नैमित्तीक कर्म सांगतों. नामकरण, उपनयन, विवाह, सन्यास, ब्राह्मोत्सव, ब्राह्मो मंदीर वार्षिक उत्सव, आन्तेष्टी हें मुख्य नैमित्तीक कर्म जाणावें. याशिवाय प्रसंगानुसार कर्मे येतील तीं जाणून करावींत, परंतु पुढें ब्राह्मो नेम सांगितले त्यास विरुद्ध येतील तीं वर्ज मात्र करावींत. या प्रत्येक नैमित्तीक कर्मांत तीन आंगें असलीं पाहिजेत. एक उपासना, दुसरें अन्नदान, तिसरें द्रव्यदान यथाशक्ति ब्राम्हो मंदिरांत देणें. नैमित्तीक कर्मांचे समय वगैरे सांगतों.

### नामकरण.

जन्म दिवसापासून तेरा दिवसांनंतर एक मासाचे आंत हा विधी करावा. घर सुशोभित करून ब्राह्मो जनांस बोलावून यथाविधी उपासना करावी. नांव पित्यानें अथवा आचार्यानें ठेवावें. नंतर पूर्वी सांगितल्या अन्वयें दान धर्म करावा. वाद्यें वगैरे असावींत. विधीच्या समयांत नाच मात्र नसावा.

### उपनयन विधी.

जन्मापासून पांचवे वर्षापासून आठ वर्षें पावेतों नेम जाणावा. निर्दिष्ट दिवस बंधु व ब्राह्मोजन यांस निमंत्रण करून घर सुशोभित करून यथाविधी उपासना करून ब्राह्मो मंत्राचा उपदेश करून उत्तम आचार्याजवळ ब्राह्मोकर्म व शास्त्र अभ्यास करवावा. शास्त्र अभ्यास पूर्ण झाल्या

नंतर या कर्माचें उत्तरांग करावें. त्याचा विधी सांगतों. विद्यार्थ्यास वस्त्रानें व पुष्पानें सुशोभित करावें. गृह शृंगारून विद्यार्थ्यांकडून आचार्यानें यथाविधी उपासना करवावी. नंतर ब्राह्मणभोजनानीं विद्यार्थी यांस अशिर्वाद वचन देऊन यथाशक्ति विद्यार्थ्यांस द्रव्य द्यावें व विद्यार्थ्यानें भवंति भिक्षांदेही ह्मणून भिक्षा मागावी. नंतर तें द्रव्य व अन्न आचार्यास द्यावें, व यथाशक्ति विद्यार्थ्यांचे माता पित्यानें आचार्यास वस्त्र व द्रव्य द्यावें. नंतर विद्यार्थी यास आचार्यानें अशिर्वाद द्यावा. विद्यार्थ्यानें पहिली भिक्षा मातोश्रीची घ्यावी. नंतर सर्वांपासून घ्यावी. पूर्वीं सांगितल्याप्रमाणें अन्नदान वगैरे करावें. कन्येस दुसरा विद्याभ्यास करूं

नये. पुत्रास अनेक विद्याभ्यास क-रवावे. यज्ञोपवीत विचार ज्याचे इ-च्छेस येईल त्यानें घालावें. ज्याचे इच्छेस न येईल त्यानें न घालावें, परंतु इच्छेस येईल त्यानें घालावें. याज़विषयीं असें जाणावें कीं, हिंदु-प्रमाणें मंत्रून घालूं नये.

विवाह विधी.

विवाहकाल कन्या बारा १२ वर्षें अथवा दहा १० वर्षें याचे आंत नसावी. तसें पुरुष वधुपेक्षां पांच सहा वर्षें वयानें विशेष असावा. उभयतांचे अनुमोदनानें व प्रितीभावानें कंन्या व वर योजावा. गुण-संपन्न, निरोगी, असें वधुवर असा-वेंत. मग ते कोणचे कुळांतील असा-वेंत. जें स्त्री व पुरुष वर्ज करावें तें एकंदर सत्यसागर अध्याय चवदा यांत सांगितले आहेत तें वर्ज जा-

णावें. विवाह विधी जो दिवस विवाहास नेमला असेल त्या पूर्वी वागनिश्चय करावा. त्या समयीं कुटुंबांतील मंडळी व ब्राह्मोजन यांस पाचारण करावें. नंतर आचार्यांनें ब्राह्मोपासना करावी. व वधुवरास विचारावें कीं, हा विवाह तुह्मास मान्य आहे. त्यानीं मान्य असें सांगितल्या नंतर उभयतांकडून पुष्पहार उभयतांचे गळयांत घालवावें. नंतर देश चालीनें साखर अथवा सरबत हें सर्वांनीं ग्रहण करावें. त्या नंतर वधुवरास उत्तम वस्त्रानें व पुष्पानें व आळंकारानें सुशोभित करून विवाह गृह सुशोभित केलेलें जागीं आणून आचार्यांनें ब्रह्मोपासना व पाणी ग्रहण विधीयुक्त लग्नविधी करावा. त्यांत मंगल वाद्यें असावींत नाच तमाशा

त्या जागीं नसावें. लग्नविधी झाल्या नंतर देश चालीप्रमाणें वधुचे नांव ठेवून वधुवरांस वस्त्रें वगैरे देण्याचे रीतीप्रमाणें देण्यांत यावें. नंतर या कर्माचे पूर्वांग झाले. आतां उत्तरांग विधी पाणी ग्रहण झाल्यानंतर आचार्यानें उभयतांस अशिर्वचण देऊन ब्रह्मो उपदेश व ब्रह्मोपासना करवावी. नंतर उभयतांकडून मातापित्यांस, आचार्यास नमस्कार करवावा. उत्तरांग समाप्त. नंतर भोजन वगैरे करावें. पूर्वीं सांगितल्याप्रमाणें अन्नदान वगैरे करावें. देश चालीप्रमाणें हळद लावावी त्यांत धर्म संबंधाचा बाध येत नाहीं, परंतु हाळदीचे पूर्वीं ब्रह्मरात्र करावी ह्मणजे ईश्वर उपासना. बायका कांहीं गाणी ह्मणतात ती मात्र ह्मणूं नयेत. ज्या

देशांत हाळदीची चाल नसेल तेथें लावूं नये. आतां कोणच्याही कुळाच्या स्त्रिशी विवाह करावा असें लिहिले याविषयीं प्रमाण. लग्नात नवऱ्याकडून स्त्रीस यथाशक्ति द्रव्य द्यावें त्यास स्त्रिधन ह्मणतात.

श्लोक.

श्रद्दधानः शुभांविद्यामाददी
तावरादपि ॥ अंत्यादपि परं-
धर्मं स्त्रीरत्नं दुष्कुलादपि ॥ १ ॥

भावार्थ.

भक्ति यानें श्रद्धायुक्त अदमीनें नजरमे साफ आनेवाली विद्या शुद्रसेभी शिखना. उसी तरा उत्तम धर्म मोक्षदायक चांडालसेभी ग्रहण करना. और आछी औरत आपनेसे नीच कुलकी होवे तो उससे विवाह करनेके वास्ते ग्रहण करणा. विवाह वर्ज निर्णय.

स्त्रीस भ्रतार व भ्रतारास स्त्री वर्ज करणें असल्यास कसें करावें तें सांगतों. व्यभिचार, हत्या असे दोषांचे महत पापाचे कारणानें अथवा दुसरे प्रकार जे शास्त्रयुक्त आहेत या कारणानें वियोग होण्यास मार्ग आहे परंतु ब्राह्मो समाजिक मतानें, दुसरें जें वर सांगितलेलें स्त्रीधन याची व्यवस्था सांगतों. जर भ्रतार वियोग करण्यास इच्छील तर स्त्रीस स्त्रीधन द्यावें व स्त्री वियोग करण्यास इच्छील तर स्त्रीधन यावर तिचा कांहीं अंश राहात नाहीं, परंतु स्त्रीधन घेतल्यानें भ्रतारास घोर नर्क प्राप्त होतो असें मनु सांगतात. यास्तव याची व्यवस्था सभेच्या अनुमोदनानें करावी. तसेंच संतानांचीही व्यवस्था जाणावी, परंतु संतानांचा

परामृश होईल अशी युक्ति करावी. केवळ या जागीं स्त्री पुरुष यांचेवरच लक्ष देऊन उपयोग नाहीं, परंतु ह्या समयानुसार संतानांचा अधिकार पुरुषासच देणे योग्य आहे. याशिवाय स्त्री पुरुष यांचे धर्म व पुनर्विवाह निर्णय सत्यसागरांत योग्य केलाच आहे. याकरतां येथें त्याचें वर्णन केलें नाहीं.

संन्यास ग्रहण.

मनुष्याचें वय, वृद्धापकाळ झाला असतां अथवा मरणकाळ समयीं संन्यास ग्रहण करावें. संन्यास ग्रहण करण्यास अधिकार केव्हां घडतो. कुटुंब संरक्षणास यथास्थीत द्रव्य आहे अथवा संतान उत्पत्ती योग्य आहे असे पुरुषास संन्यास ग्रहण करण्यास योग्य आहे. संन्यास ग्रहण ह्मणजे रानोरान फिरणें हा संन्या-

स ग्रहण नव्हे, तर इंद्रिय निग्रह, मनो निग्रह, कामक्रोधादिक वर्ज, संसार बंधन त्याग, परोपकारी देहास श्रम देणें, अलस्य त्याग करणें, सर्वकाळ आत्मउन्नतींचे कार्यांत परिश्रम करणें याचें नांव संन्यास ग्रहण करणें. मग त्यास अधिकार आहे कीं, तो संसारांत राहो अथवा देश पर्यांटन करो अथवा कसेंही वस्त्र परिधान करो. तसेंच परपिडा न करणें, द्रव्य संचय न करणें, याचेंच नांव संन्यास ग्रहण.

आन्तेष्टी.

ब्राह्मो अथवा ब्राह्मी असो प्राणोत्कर्म समयीं उपासना व्हावी. प्राणोत्कर्म होई पावेतों. प्राणोत्कर्म झाल्या नंतर सुगंधादि पदार्थांनें स्नान उत्तम प्रकारें घालून उत्तम सुगंधी पदार्थ पुष्प, कर्पूर, चंदन यानीं सुगंधी क-

रून उत्तम वस्त्र परिधान करून उत्तम वस्त्रानें आच्छादन करून उत्तम वहनांत ठेवून तेथें आगरवत्ती वगैरे सुगंधी पदार्थ लावून ईश्वर उपासना करून त्याचे कुटुंबांतील सर्वत्रांस त्याचें मुख दाखवून नंतर मुख आच्छादन करून ॐसत्यं ब्रह्मकृपाहीकेवलं तवनामनिर्मलं असें ह्मणत घेऊन जावें. अथवा संगीत ह्मणत घेऊन जावें. नंतर स्मशान भूमींत गेल्यावर यथाविधी उपासना करून समाध सुगंधी द्रव्यानें सुंगधीत करून शवावर मृत्तीका न पडे असे युक्तीनें मृत्तीका द्यावी. मृत्तीका देण्यापूर्वी सर्व ब्राह्मोजनानीं ॐतत्‌विष्टो० हा मंत्र ह्मणून प्रथम थोडी मृत्तीका त्याचे डोसक्याचे बाजूस ठेवून वरून दुसरी मृत्तीका सर्व द्यावी. नंतर उद-

कानें सर्व बरोबर समाध करून यथाविधी उपासना करावी. नंतर घरीं येऊन मृत याचे कुटुंबाचें समाधान करून प्राणोत्कर्म झालेले जाग्यावर उपासना करावी. नंतर ब्राह्मोजनानीं आपापले गृहीं जावें. मृत ब्राह्मो अथवा ब्राह्मी बरोबर समाधींत उपासनेचें पुस्तक ठेवावें. या जागीं अग्नी डागाची क्रिया कां करूं नये हा प्रश्न उत्पन्न होतो त्याचें उत्तर उपनिषधांत स्पष्ट सांगितलें आहे कीं, ब्राह्मोज्ञानी ब्रह्म स्मरणानेंच पवित्र असून ब्रह्म नामाचा डाग ज्याचे हृदयास बसला आहे याकरितां अग्नी डाग देऊं नये. दुसरें व्यवहारीकरीतीनेंही अग्नीडाग देणें महा अघोर कर्म आहे. उदाहरण ज्या मातापित्यानें आपल्यावर महत् उपकार

केले त्यांस आपले समक्ष जाळणें अथवा आपण कानानें ऐकणें हें केवढें कठोर कर्म होय. अशीं कितीएक उदाहरणें आहेत, परंतु या स्थानीं केवळ उपनिषध वचनावरच निर्णय केला आहे. आतां याचें उत्तरांग सांगतों. मृताचे चवथे दिवशीं उत्तम सुगंधी जिनसा, पुष्पें, फळें या सर्व सामोग्रीनें सिद्ध केलेले स्थानीं ब्रह्मो उपासना करावी. या समयीं ब्राह्मोजन व इतरही मनुष्यें असावींत. उपासना झाल्यानंतर ते सर्व पदार्थ ब्रह्म प्रित्यर्थ सर्वत्रांस द्यावें. तसेंच दहावे दिवशीं उत्तम अन्नें पक्क केलेलीं, उत्तम वस्त्रें, उत्तम वहानें, उत्तम पात्रें, ब्रह्म प्रित्यर्थ द्यावीं. शय्या इत्यादि. तसेंच विसावे दिवशीं जाणावें. यथाशक्ति ब्रह्म मंदिरांत द्रव्य द्यावें.

उत्तरांग समाप्त. आतां विशेष जाणावें, केशवपन सुतक करूं नये. ज्याची इच्छा असेल त्यानें प्रथम दिवसापासून दहा दिवस पावेतों धर्म पुस्तकाचा पाठ व उपासना करावी. आतां मृताचें दर वर्षास श्राद्ध करीत जावें.

मोहोत्सव विधी.

हा दिवस पौष संक्रातीपासून अकरावा दिवस ह्या दिवशीं हा दिवस येतो. ह्मणजे तारीख २३ जानेवारीचा दिवस जाणावा. या दिवशीं ब्राह्मोजनानीं संगीत उपासना करावी. ज्या देशांत इतर ब्राह्मो नसून एकच घर आहे तेथें त्यानेंच उपासना करावी, व ब्रह्म प्रित्यर्थ दानधर्म करावा, व या दिवशीं आनंद करावा. हा शुभ दिवस ब्राह्मोचे नवे साल आरंभाचा आहे. ह्मणजे जना-

म स्थापना केली तो हा मुख्य शुभ दिवस मुबारक आनंदाचा आहे. या दिवशीं कोणचेंही पापकर्म आचरण करूं नये. हा उत्सव ब्राह्मो व ब्राह्मीस करणें योग्य आहे.

### ब्रह्ममंदीर उत्सव वार्षिक.

ब्राह्मो कोणच्याही देशीं असो. त्या देशांत ब्राह्मो मंदीर असून त्या मंदिराचा उत्सव आहे असें समजेल तर तेथील समाजिका बरोबर उत्सवास जाऊन मिळावें, व आनंदयुक्त उपासना करावी, व यथाशक्ति द्रव्य द्यावें.

### प्रसंगानुसार नैमित्तीक.

कोणचेही समयीं देशमानानें अथवा कालमानानें, रूढीमानानें नैमित्तीक कर्माचा प्रसंग आल्यास उपासना, दान इत्यादि करावें.

ब्रह्मस्मृति नित्यनैमित्तीक कर्म निरोपणं नाम चतुर्थोऽध्याय समाप्त. ब्रह्मारपणमस्तु.

## ब्राह्मधर्माचीं मूलतत्वें.

१ एक सर्व सृष्टीचा जनक असा जो पूर्णब्रह्म निराकार सर्वगुण संपन्न याचीच उपासना करणें सर्वांस युक्त व उचित आहे. २ ईश्वर उत्पन्न कृत कोणचेही पदार्थांची उपासना करणें योग्य नाहीं. ३ मूर्तिपुजेचे कोणचेही कर्मांस उत्तेजन देऊं नये. ४ मूर्तिपूजा नाहींशी होईल तितका इलाज करावा. ५ मूर्तिपूजेचें कोणचेही प्रकारचें चिन्ह धारण करूं नये. ६ गंध. माळा इत्यादि. ७ जें ज्याला हक्कानें मिळावयाचें तें नाहींसें

करूं नये. ८ सत्यसील असावें. ९ कोणाचेही द्रव्याचा अभिलाष करूं नये. १० जें कर्म करावें तें ब्रह्म प्रित्यर्थ करावें. ११ होईल तितका परोपकार करावा. १२ द्वेष कोणाशीं करूं नये. १३ ज्ञातीभेद मानूं नये. १४ ज्ञातीभेद चालले कृत्यास साह्य करूं नये. १५ विवाहीत स्त्री शिवाय इत्तर स्त्रीस भगिनी प्रमाणें जाणावें. १६ होतील तितके ईश्वरी मार्गांत लोकांस आणण्याकरितां श्रम करावे. १७ शेंकडा उत्पन्नांतून ब्रह्म प्रित्यर्थ पांच रुपये द्यावे. धर्म कृत्यास. १८ कोणचेंही कर्म करणें झाल्यास ब्राह्मो नेमाप्रमाणें नेमा विरुद्ध करूं नये. १९ कोणाच्याही धर्माचा अनुयायी ब्राह्मो अनुयायी होण्यास नड नाहीं, परंतु दुष्ट कर्म

त्याग केलें पाहिजे. २० ब्राह्मोस उचित आहे कीं, शक्तीनुसार नित्य ब्रह्मोपासना, ब्रह्म प्रित्यर्थ दान, द्रव्य न घेतां उपकार तोच परोपकार, शुचिर्भूत राहाणें हें कर्म नित्य करावेंच. हीं एकंदर मूलतत्वें सांगितलीं. याविषयीं एकंदर वाक्यें यथाशास्त्र निर्णय सत्यसागरांत यथास्थीत केला आहे. याकरतां यांत निर्णय करण्याची गरज न वाटल्यामुळें केला नाहीं.

ब्रह्मस्मृति मूलतत्वे निरोपण नाम पंचमोऽध्याय समाप्त ब्रह्मारपणमस्तु.

# कोणचेही उपासनेचे आरंभीं उपासना करणें ती.

पद.

धांव जगदीश्वरा । पाव करुणा करा । ठेवि या किंकरा । सतत पायीं ॥ ध्रु० ॥ दुरित भारें अति । पिडीलों जगपति । देई मज सन्मति । दीननाथा ॥ धांव० ॥१॥ प्रेमपाशीं मला । बद्ध करी वत्सला । ह्मणवि मज आपुला । मायबापा ॥ धांव० ॥ २ ॥ तुजविणें दुसरा । मज नसे आसरा । उद्धरी पामरा । कृपासिंधो ॥ धांव० ॥ ३ ॥

उपासना.

( हे पूर्णब्रह्म परमेश्वर या समयीं तुझें ध्यान करीत आहोंत. एक-

चित्तें तथा स्थीर मनानें प्रार्थना करतों. )

श्लोक.

ध्यान---ॐसत्यं ज्ञानमनंतं ब्रह्मआन्दं रूपंमृतं ॥ यद्विभातिशान्तं शिवंद्वैतं शुद्धमपापविद्धम ॥ १ ॥

उपासना.

जिवांत राहाणारा परमात्मा माझे अन्तरस्थ विराजमान आहे. संसाराचे सर्व चिंत्तेस सोडून आपले आत्म्यास त्याजकडे लावूं. त्याचे ज्ञानांत तेजास पाहूं. त्यांचे दयेचा व गुणाचा विचार करूं. नेत्र झांकून ॐसत्यं शिवसुंदरं ॥ हा मंत्र ह्मणून ईश्वराचें स्वरूप ध्यानांत आणून कांहीं वेळानें नमस्कार करावा.

भजन.

दया करो प्रभु अन्तरयामी ।

महाबली मै कपट कामी ॥
धृ० ॥ मनुष्य जन्म दियो तुम
उत्तम । और किया सुख सम्प-
दधामी ॥ दया० ॥ १ ॥ तद-
पी त्याग तुमारा नाम दयाम-
ये । राहासदावी शयनमे आ-
नुगामी ॥ दया० ॥ २ ॥ पाप
तापसे भयामै पिडीत । आब
मुझसे थावंत नहिथामी ॥ द-
या० ॥ ३ ॥ हुवा मै निराश
आब जगतसे । आयाहुं शरण
तुह्मारे स्वामी ॥ दया० ॥ ४ ॥

पद.

साष्टांगे नमुन प्रणाम करितों
सर्वेश सच्चिद्घना । अंतर्याम
विदित सर्व तुजला जिवांतील
कामना ॥ धृ० ॥ दोष आहेत
अगणित पदरीं अंति गति
आमची कशी प्रभु । राखावी

करुणा दया तुम्ही ही आशा आहे बहु ॥ साष्टां० ॥ १ ॥ मागतो प्रभु प्रार्थना स्तुति करूनि आर्थ बहु आह्मी । त्यामध्यें परिपूर्ण अर्थ वाटेतो करा तुह्मी ॥ २ ॥ साष्टां० ॥ त्राता आहेस प्रभु तूं सर्व जीव शरण तुह्मा । लोकांचे उपयोगी कार्य करावें असा मार्ग दाखवा आह्मा ॥ साष्टां० ॥ ३ ॥

पद.

करचरणानें जें मी केलें कर्म खोटें। श्रवण नयन चित्तें जें केलें पाप मोठें ॥ धृ० ॥ अतिशय करुणेनें करा क्षमा नाथ आह्मा । जयजय करुणाब्धे नमुनि त्या तुह्मा ॥ १ ॥

कथा.

पूर्व काळाचे ठायीं एके समयीं इंद्र

व असूर ह्मणजे ईश्वरास न मानणारे दुष्ट यांचें युद्ध होत असतां ब्रह्म सत्तेनें इंद्राचे फौजेस जय प्राप्त झाले, त्यावरून इंद्र इत्यादि देवांस गर्व प्राप्त झाला कीं, हे जय स्वतः आह्मी मिळविले. दुसरा कोणी जय देणारा नाहीं, असा गर्व झाल्यावरून सर्व जाणणारा सर्वसाक्षी असा जो सर्व शक्तिमान अन्तरसाक्ष यानें इंद्रादिकांचे गर्वास जाणलें. कृपाळू प्रभु यानें दया केली कीं, ह्या इंद्रास गर्वाचे कारणानें आपजय प्राप्त होईल, तर त्याचा गर्व नाश करावा या हेतूनें आपलें पवित्र तेज प्रकाश करिता झाला. तथापि गर्वांत निमग्न झालेले इंद्रादिक यानीं कांहींच पूर्णब्रह्म सर्व पूज्य याचे शक्तीस ओळखलें नाहीं. त्यानंतर इंद्र बोल-

ता झाला कीं, हे अग्ने आह्मांत तूं तेजस्वी आहेस याकरितां आतां जो प्रकाशमान झालेला प्रकाश कशाचा काय याचा शोध कर. अग्नि तथास्तु बोलून चालता झाला. ब्रह्मलोकाचे ठायीं अग्नि गेला तेथें आकाशवाणी झाली कीं, तूं कोण आहेस. अग्नि बोलता झाला कीं, मी महान तेजस्वी, सर्वांस मी आपले इच्छेनें भस्म करणारा असा सामर्थ्यवान अग्नि आहें. आकाशवाणी झाली. हे अग्नि तुझे समक्ष गवताची काडी आहे यास भस्म कर. अग्नीकडून जेव्हां ती काडी जळाली नाहीं तेव्हां अग्नि परत येऊन इंद्रास बोलता झाला. हे इंद्रा जेणेंकरून मी जाळतों ती शक्ति कांहीं निराळी आहे. अद्याप तीस ओळखण्यास मी शक्तिमान नाहीं

असें बोलला. हें इंद्रानें ऐकून इंद्र वायूस बोलता झाला. हे वायु असा जो शक्तिमान याचा शोध तूं कर. वायु तथास्तु बोलून चालता झाला. वायु ब्रह्मलोकाचे ठायीं जाता झाला. तेथें आकाशवाणी झाली कीं, तूं कोण आहेस. वायु बोलता झाला मी सामर्थ्यवान वायु आहें. सर्व जगास मी उडवून टाकीन. त्या समयीं आकाशवाणी झाली कीं हे वायु गवताची काडी जी तुझे समोर आहे यास उडवून टाक. वायूनें आपलें सामर्थ्य सर्व खर्च केलें, परंतु ती काडी जराही हालली नाहीं. तेथून वायु चालता झाला. इंद्राजवळ आला. वायु बोलतो. हे इंद्रा आमच्यांत कांहींच शक्ति नाहीं. ज्याचे शक्तीनें आह्मी कार्य करितों ही

कोणाची त्यास ओळखण्यास आह्मी असमर्थ आहोंत. त्या समयीं सर्व देवतांनीं इंद्रास सांगितलें कीं, हे इंद्रा असें ज्याचें महत सामर्थ्य त्याचा शोध तूं करण्यास योग्य आहेस. इंद्र तथास्तु ह्मणून चालता झाला. इंद्र ब्रह्मलोकाचे ठायीं गेला तेथें जातांच आकाशवाणी न होतां पूर्णब्रह्म याचें पवित्र तेज इंद्राचे नेत्रांतून आदृश झालें या करतां इंद्र याचा गर्व नाहींसा होऊन अति विस्मीत होऊन परत न जातां पूर्णब्रह्म याचे स्वरूपीं निमग्न होऊन ध्यानस्थ तेथेंच बसला. या कारणानें दयाळू पिता यास दया उत्पन्न होऊन त्यानें आपले कृपेनें हेमवती नामक स्त्रीस उत्पन्न करून इंद्राचे समक्ष प्रगट झाली ती महत स्वरूप-

वान, सुवर्णाहून दैदीप्यमान, अशी ब्रह्मविद्या प्रगट होती झाली. हें पाहून इंद्र विचारता झाला हे माते जें तेजरुप पाहाण्यांत येऊन अदृश झालें हें कोणाचें व काय हें सांग. त्यावरून हेमवती उपदेश करिती झाली. हे इंद्रा ज्याचें दर्शन तुजला झालें तें पूर्णब्रह्म स्वरूप अति दैदिप्यमान होतें. ज्याचे कृपेनें तुह्मास असुरांवर यश प्राप्त झालें. तुह्मी केवळ निमित्त्यासच पात्र आहां. जय आपजय देणारा सर्व शक्तिमान पूर्णब्रह्म आहे. असें जाणून इंद्राचा गर्व हारण होता झाला. तात्पर्य ज्या कथा केवळ देवी पुराण, मल्हारी महात्म यांत आहेत कीं, जय देवीनें आपले सामर्थ्यानें मिळविले ह्या केवळ कपोल कल्पित कथा आहेत हें सिद्ध केलें.

दुसरें जें हिंदु ईश्वर अवतार घेतो हें-
ही ह्मणणें कपोल कल्पित आहे हें-
ही याच कथेनें सिद्ध केलें. तिसरें,
हिंदु ह्मणतात कीं, ईश्वर दर्शन होत
नाहीं हेंही ह्मणणें सर्वथैव विरुद्ध आहे.
चौथें, ब्राह्मो ह्मणतात कीं, ईश्वर द-
र्शनास ध्यान हेंच मुख्य साधन आहे.
हा सिद्धांत केवळ सिद्ध आहे हें याच
कथेवरून सिद्ध केलें. ही कथा तल-
वकार नामक ब्राह्मो ऋषीनीं कथन
केली.

ब्राह्मस्मृति ब्रह्मदर्शन निरो-
पणं नाम शष्ठमोऽध्याय समाप्त
ब्रह्मार्पणमस्तु.

तेच मानवी धन्य होत कीं, जे नास्तिकाच्या व असत्याच्या उपदेशावर चालत नाहींत, व असत्याचे मार्गांत उभे राहात नाहींत, व वाईट लोकांचे सभेंत बसत नाहींत, परंतु ईश्वरी मार्गांत संतोषी राहातात, व रात्रंदिवस ब्रह्म विचारांत असतात. असा मानवी कल्पतरूचे वृक्षाप्रमाणें नित्य प्रफुलीत राहातात, आपले हरएक कामांत प्रफुलीत राहील. असत्य असे नव्हेत, तर केवळ कचरा यास जशी हवा उडवून नेती तसे आहेत. अपराधी ब्रह्मदसांत व असत्य सत्यांच्या सभेंत कधीं उभे राहाणार नाहींत.

पद.

धन्य धन्य प्रभु करुणाकर देवा। तरती हीन दीन रंक करुनि तुझी सेवा ॥ धृ० ॥ देखुनि अनुतप्त हृदय ॥ धांव घेशी दयामय ॥ दर्शनेंचि देशी अभय ॥ निजपद सुख ठेवा ॥ धन्य० ॥ १ ॥ भक्तिप्रिय तूं परेश हरिशी सकळ भक्त क्लेश निवडुनिया दुरित लेश ॥ देशी प्रेम मेवा ॥ धन्य० ॥ २ ॥ तरि होउनि शुद्ध चित्त मंगलमय गाऊं गीत प्रेम भक्तिचाचि नित्य राखु मनी हेवा ॥ धन्य० ॥ ३ ॥

पद.

तुह्मि सर्वांहून महान। या उत्तम नीति ज्ञान। आश्रय आधार सत्य। राखोनि तुमचा ॥ध्रु०॥ प्रभु सत्व गुणमय। करितो अ-

ति विनय । अल्प जिवाची स्थिति । मनांत विचारा । तुह्मि० ॥१॥ आह्मि अशक्त प्राणी । मुखानी विनवितो वाणी । क्षमा विना प्रभु नाहीं ॥ निर्वाह आमचा ॥ तुह्मि० ॥ २ ॥ पापकर्म परिहारा । विघ्न सर्व दूर करा । मंद आहे आमची मति । प्रभु ती सुधारा ॥ तुह्मि० ॥ ३ ॥

उपासना गर्व हारण.

जाती कशासाठीं अभिमानांत आहेत. असत्यांत वर्तन करीत आहेत ते मनसुबे करून माझे दासास बंधनांत घालतात. त्यांना बंधनांतून मी मुक्त करीन. जो ब्रह्मलोकांत आहे तो त्यांचें भाषण ऐकून हांसतो, व त्यांची विनंती अमान्य करतो तो क्रोधानें त्यांस शिक्षा देईल. केवळ

बेजार होऊन त्यांस दुःखांत टाकील. याकरतां भीत भीत ब्रह्म उपासना करा. कंपायमान होत होत आनंद करा. पूर्णब्रह्म तुह्माशीं बेजार न होईल, परंतु तुह्मी त्याचे कार्यांत हालाक व्हा. धन्य जगांत तोच पुरुष. ज्याचा सर्व भार पूर्णब्रह्म याजवर आहे.

पद.

प्रभु अपराध क्षमा कर आमचा॥
ध्रु० ॥ निंदित कर्म जें मी केलें ।
तें प्रभु सर्व विसरा ॥ प्रभु० ॥१॥
शरण राहु प्रभु चरणें वंदु । भव-
जल पार उतारा ॥ प्रभु० ॥ २ ॥
दास तुमचा रक्षण करावा ॥ हा-
च प्रभु धर्म तुमचा ॥ प्रभु० ॥३ ॥
कृपाघना कृपादृष्टि करूनि । म-
ति प्रभु आमची सुधारा ॥ प्रभु०

॥ ४ ॥ करद्वय जोडुनी विनंति करितो । संकट सर्व निवारी ॥ प्रभु० ॥ ५ ॥

कथा.

चेतरमण राजा पूर्वकाळाचे ठायीं होत असतां एके दिवशीं सभेचे ठायीं सिंव्हासनारुढ असतां एक यज्ञशाली अग्निपुजक असा ब्राह्मण होता. तो त्या सभेप्रत येता झाला. राजास नमस्कार केला. राजानें त्यास नमस्कार केला, व त्यास बसावयास आज्ञा दिली. तो बसल्या नंतर राजानें त्यास प्रश्न केला कीं, हे यज्ञशाली असा यज्ञ कोणचा आहे कीं, जेणेंकरून चिरकाल ब्रह्मलोकाचे ठायीं वास होईल तो यज्ञ सांगा. यज्ञशाली उत्तर देता झाला कीं, राजन् या यज्ञ कर्मांत माझा पिता

फार ज्ञानी आहे. मी त्यास विचारून उत्तर देईन. राजानें बरें ह्मणून उत्तर दिलें. तो यज्ञशाली राजास नमस्कार करून आपल्या गृहाप्रत गेला. आपले पित्यास राज प्रश्न सांगता झाला. त्याचा पिता फार ज्ञानी होता. पिता उत्तर देता झाला हे पुत्रा असा कोणचाही यज्ञ नाहीं. कारण सर्व यज्ञांत जे महा यज्ञ, अश्वमेध, गोमेध याचेंही फल चंद्रलोक पावेतों असून दुसऱ्या योनीप्रत जावें लागतें, तर हे पुत्रा असा जो प्रश्न करणारा राजा त्याप्रत मला घेऊन चल. दुसरे दिवशीं पुत्रानें पित्यास राज सभेप्रत नेलें. पिता पुत्रानें राजास नमस्कार करून बोलते झाले कीं, हे राजन् आह्मास आपले शिष्य करून ब्रह्मलोकाचें जें

चिरकाल राहाणारें सुख प्राप्त होण्यास मुख्य यज्ञ कोणता याचा उपदेश कर. राजा हें ऐकून उभयतांस ब्रह्म विद्येचा उपदेश करता झाला. सारांश या कथेवरून हें सिद्ध केलें कीं, ब्रह्म धर्मावांचून उन्नत्तीस दुसरा मार्ग नाहीं. ही कथा ऋग्वेद उपनिषध यांत आहे.

पद.

पुरे तें एक आह्मासाचें। सुमंगल नाम अनंताचें ॥ धृ० ॥ तिर्थें व्रतें प्रतिमा। अर्चन देह दंडन हावनादी। असारबाही सारीं साधनें लागूं नका या नादीं ॥ पुरे० ॥ १ ॥

आर्ती.

जयदेव जयदेव जय जगदाधारा जय जगदाधारा ॥ अंतर्यामि अ-

पारा (२) सर्वोत्तम भगवाना॥ जयदेव० ॥ १ ॥ स्वयंभु विभु आपण। त्रिभुवन व्यापि। (२) सुख संतोषें द्यावें (२) किल्बिष सर्व कापि ॥ जयदेव० ॥ २ ॥ मंगल सुंदर रूप करुणामय तुमचें। (२) चित्तामध्यें नित्य राखा। (२) प्रेमभाव तुमचे॥ जयदेव० ॥ ३ ॥ श्रद्धारूपी अर्घ देउं चरणें। (२) गंधाक्षत भक्तीनें। (२) अर्पि राहु शरणें॥ जयदेव० ॥४॥ एका ग्रंथी ध्यान-धरूं चित्तें। (२) प्रेम पुष्प वाहु। (२) प्रभु मस्तकीं नित्य॥ जयदेव० ॥ ५ ॥ सदाकाळ सान्निध जाणुनी देवा। (२) ज्ञान दृष्टि पारखु। (२) हि उत्तम सेवा॥ जयदेव० ॥ ६ ॥ विस्ता-

(२) साष्टांगे तुह्मासहि ॥ २ ॥
प्रणमु जगराया ॥ जयदे० ॥ ७॥

ब्रह्मस्मृति उन्नतिसाधन निरोपणं नाम सप्तमोऽध्याय समाप्त ब्रह्मार्पणमस्तु.

---

ॐ तत्सत ब्रह्मणेनमः

## अध्याय ८.

पद.

दिनाचा दयाळ सोडुनि कोणा शरण जाउ ॥ धृ० ॥ मातापिता जाणी प्रभु । चरण तुझे ध्याउ । पाउनी प्रसाद पूर्ण । कृतकृतार्थ होउ ॥ दिना० ॥ १ ॥ नीति भक्तिरुपी पुण्य । तिर्थी मी नाहु ।

परम इष्ट ब्रह्मची । स्तुति गुण गाउ ॥ दिना० ॥ २ ॥ प्रभु कृपा निधनाची । पूर्ण कृपा इच्छु । संकट समयीं नाथ पल्लव तुझा धरूं ॥ दिना० ॥ ३ ॥ नमीन मी परात्परा तुला । शरण तुझे जाउ । प्रेम पुष्प अंजली । प्रभु चरणें वाहु ॥ दिना० ॥ ४ ॥

उपासना धन्यवाद.

हे पूर्णब्रह्म तूं आह्मास त्या लोकांपासून वाचीव कीं, जे ह्मणतात ईश्वरापासून उन्नति होत नाहीं, परंतु हे प्रभु तूं आमची केवळ ढाल आहेस. व माझें सामर्थ्य व माझा कल्याणकर्ता एक तूं आहेस. मी उंच स्वरानें पूर्णब्रह्म यास विनंती केली. त्याणें माझा स्वर पवित्रस्थानीं ऐकला. याच कारणानें मी शप-

न केलें व निद्रिस्थ झालों. जागृत झालों कारण तोच माझा रक्षक होता. जागृत हो, हे माझे प्रभु मला वाचीव, कारण तूंच माझे सर्व शत्रूचे मुखांत मारलेंस. तूंच पापी यांचे दन्त तोडलेस. ब्रह्महो उन्नति करतो. तुझी पवित्र दृष्टी तुझे दासावर आहे. हें माझ्या भरंवशाचे पित्या संकटांत तूंच मला धैर्य देतोस. मजवर कृपा कर आणि विनंती ऐक. हे पूर्णब्रह्म तुझे पवित्र तेजाचा उजेड मजवर प्रकाशमान कर. तूंच आह्मास अन्न, पाणी देऊन सुखी ठेवतोस. तसेंच आमचे मनास आनंद देतोस तेणेंकरूनच या जगांत सुखानें तूंच आह्मास ठेवतोस. तथास्तु.

पद.

तूं माझा यजमान ॥ श्रीहरि तूं

माझा यजमान ॥ धृ० ॥ जननी जठरीं रक्षियलें मज ॥ पोसुनि पंचही प्राण ॥ श्रीहरि० ॥ १ ॥ जन्म होतांची मातेचे स्तनीं ॥ पय केलें निर्माण ॥ श्रीहरि० ॥२॥ ऐसें असतां या पोटाची ॥ कां चीतां जाण ॥ श्रीहरि० ॥ ३ ॥ तुझिये ठायीं लीन जगत्पति ॥ धरी माझा अभिमान ॥ श्रीहरि० ॥ ४ ॥

पद.

भव पति संकट सर्व हरा । अपराध अति मी केले । अनुग्रह पूर्ण करा ॥ भवपति० ॥ १ ॥ अनन्य भावें राहु तुमचा । आश्रय एक खरा ॥ भवपति० ॥ २ ॥ करजोडुनि विनंति करितो । प्रभुतें चित्तीं धरा ॥ भव० ॥ ३ ॥ क-

रुणा दृष्टी मज हृदये । प्रेमळ भ-
क्ति भरा ॥ भव ॥ ४ ॥

उपासना आपत्काळ.

हे देवाधीदेवा जे मला दुःख देतात कारण कीं, ते आमचेपेक्षां ज्यास्ती आहेत. जे माझें शत्रुत्व करतात व जे माझे जिवास ह्मणतात कीं, जगदीश्वरा पासून याची उन्नति नाहीं. हे ब्रह्म जेव्हां मी तुला उंच स्वरानें हाक मारीन तेव्हां तूं ऐक. हे माझ्या भरंवशाचे ईश्वरा तूं मला तंगींतून वाचविलें. मजवर दया कर. माझी प्रार्थना ऐक. हे मनुष्यहो तुम्ही कोठपावेतों ईश्वराचे अनुग्रहास मानणार नाहीं, व असत्याचें मित्रत्व कराल व नास्तिकत्व चालवाल. पूर्णत्वानें जाणा कीं, पूर्णब्रह्म यानें आपले सेवकास निवडलें

आहे. ब्रह्म यास जेव्हां मी हाक मारीन तत्क्षणी तो ऐकेल. भरंवसा ठेवा, पाप करूं नका, स्वस्थतेंत विचार करा. आणि गप्प राहा. आणि सत्यत्वाचे बळी द्या, आणि पूर्णब्रह्म याजवर भरंवसा ठेवा. कितीएक ह्मणतात कीं, असा कोण आहे, जो आह्मास आनंद दाखवील. हे प्रभु आह्मास हाच आनंद दे कीं, तुझे पवित्र स्वरूपाचें दर्शन होवो. ॐ-तथास्तु ॥

दिंडया.

दास आह्मी पावलों तुझ्या द्वारीं॥
देई दर्शन तूं होई साहाकारी ॥
मोहोपाशें पीडिलों दिननाथा ॥
राहु आतां ठेवुनी पदीं माथा ॥१ ॥
विरह तुझा ताप दे बहु चित्ता ॥
दूर न धरी लेकरा जग ताता ॥

करिति खोड्या बालकें परी माता॥
क्रोध न धरी चित्तांत कृपावंता ॥ २॥

श्लोक.

असतो मासग्द्मय तमसोमा
ज्योतिर्गमय मृत्यौर्मामृतं गम-
य ॥ आविराविर्मणाधिरुद्र्यते
दक्षिणं मुखंतेनमां पाहिनित्य-
म् ॥ १ ॥

कथा.

पूर्व काळाचे ठायीं राजा जनक पुत्र नैमीचा हा फार ब्राह्मोज्ञानी होता. त्याच समयांत व्यास महामुनी ज्याची मातोश्री ढवरीन होती. हे वेदव्यास ब्रह्मज्ञानेकरून ब्राह्मो झाले. यांचा पुत्र शुक यास वेद व्यासानें ब्राह्मो उपदेश करून ब्रह्मज्ञान, ब्रह्मविद्या शिकविली, परंतु जसें ब्रह्मज्ञान व्हावें तसें त्यास झालें नाहीं.

या कारणावरून वेदव्यासानें शुकास सांगितलें कीं, या काळांत जनकाप्रमाणें ब्रह्मोज्ञानी नाहीं याकरितां तूं जाऊन त्यांस भेट. त्यावरून शुक चालता झाला. कितीएक दिवसांनंतर जनक राजाचे घरीं पोंचला. तेथील द्वारपाळास सांगितलें कीं, राजास वर्तमान सांगा कीं, मी शुक आलों आहे. द्वारपाळानें जाऊन राजाप्रत नमस्कार करून शुकाचें वर्तमान सांगता झाला. राजानें द्वारपाळास आज्ञा दिली कीं, शुकास सांगावें कीं, तुझे बरोबर दुसरा गृहस्थ आहे त्यास ठेवूनये. द्वारपाळानें राज आज्ञा शुकास सांगितली. शुकानें हें ऐकून अतिशय विचारांत पडून इकडे तिकडे पाहूं लागला. पुनः पूर्ववत शुकानें द्वारपाळास सां-

गितलें. राजानें पूर्ववत द्वारपाळास आज्ञा दिली. येणेंप्रमाणें कितीएक वेळेनंतर शुकानें विचार करून द्वारपाळास सांगितलें कीं, राजास जाऊन सांग कीं, शुक आला आहे. हें राजानें ऐकून द्वारपाळास आज्ञा दिली कीं, शुकास बोलीव. राजआज्ञेप्रमाणें द्वारपाळानें शुकास पाठविलें. राज सभेस शुकानें येऊन राजास नमस्कार करिता झाला. राजानें नमस्कार करून क्षेम कुशल विचारून येण्याचें कारण विचारता झाला. शुकानें आपलें येण्याचें कारण निवेदन केलें. त्यावरून राजानें आपलें नगर शृंगारण्यास आज्ञा दिली. रात्रौ सर्व नगर शृंगारलें. त्या समयीं एका परातींत पाणी भरून शुकाचे हातांत दिली, आणि राज सेवकास आज्ञा

दिली कीं, नग्न तलवारी करून शुका समागमें जावें. पात्रांतून एक थेंब पडला तर शुकाचा शिरछेद करावा. आज्ञेप्रमाणें सेवकासहीत नगर पाहाण्याकरितां शुकास पाठविलें. सर्व नगर पाहून शुक परत आला. त्या समयीं जनकानें शुकास प्रश्न केला कीं, हे शुका नगरांत आपल्यास कोणचा पदार्थ पसंत आला. शुकानें उत्तर दिलें हे राजन्न तुझे दूत बरोबर होते आणि पात्रांत पाणी होतें या कारणानें मी कांहींच पाहिलें नाहीं. हे शुका असें जाण कीं, जसें तुझें ध्यान जलावर होतें तसें पूर्णब्रह्म याजकडेस लाव. व जसें तुला खडगाची भीति होती अशी ब्रह्मयाची भीति बाळग, व जसें तूं नगरांत जलावांचून कांहीं पाहिलें नाहीं

[illegible]
वांचून कांहीं पाहूं नको, कारण ब्रह्म प्राप्तीस मूळ कारण ब्रह्मो विद्या व भाव हेंच होय. हे शुका ब्रह्मतत्व याचा उपदेश तुला केला. आतां तुझा पिता वेदव्यास याला नमस्कार सांग. आणि हें सर्व त्यास निवेदन कर. सारांश जे आज काल ब्राह्मण ज्यांस त्यांस सांगतात कीं, उपदेश करणें हा आमचा धर्म आहे. व इतरास अधिकार नाहीं, तर हें सर्वथैव त्यांचे ह्मणणें व्यर्थ आहे; कारण व्यासासारखे महाज्ञान्यानीं जर उपदेश घेण्यास शुकाला ब्राह्मणांची गरज बाळगिली नाहीं तर आज कालचे ब्राह्मण ओढून ताणून पाटील ह्मणण्याचा अधिकार घेतात हा एक बाजूस ठेवून ब्रह्मज्ञान उप-

## देश साधन करावें हेंच उत्तम होय.

पद.

दयाळा प्रभो तुझे मी धरिले
पद ते तार। कर मज भवपार॥
ध्रु० ॥ दु:सह या भवतापें बा-
पा शिणलों मी अनिवार।
लेकरूं शिणलों मी अनिवार॥
कर० ॥ १ ॥ काममदादिक क्रू-
र रिपु हे गांजिति वारंवार।
मज दीना गांजिति वारंवार ॥
कर० ॥ २ ॥ दीनसख्या मज
दु:ख ग्रस्ता अन्य नसे आधा-
र। तुजविण अन्य नसे आ-
धार ॥ कर० ॥ ३ ॥ असशी
कराया तुचि समर्थ सुतर जो
दुस्तर फार। भवसिंधु सुतर
जो दुस्तर फार ॥ कर० ॥ ४ ॥
शरण तुला हें जाणुनि आलों

माझा घे कैवार । पतित मी
माझा घे कैवार ॥ कर० ॥ ५ ॥

अभंग.

नाम घेतां वाया गेला । ऐसा कोण आईकिला ॥ १ ॥ सांगा विनविती तुह्मासी । संत महंत सिद्ध ऋषी ॥ २ ॥ नामे तरला नाहीं कोण । ऐसा द्यावा निवडुन ॥ ३ ॥ सलगीच्या उतरा । तुका ह्मणे क्षमा करा ॥ ४ ॥

आर्ती.

जयदेव जयदेव जय मंगल दाता जय मंगल दाता । विश्वतणा विभुधाता (२) भक्तजन त्राता ॥ जयदे० ॥ १ ॥ करुणासिंधु कृपाळ कृति नका पाहू (२) अल्प मती जिवाचे (२) दोष नका पाहूं ॥ जयदे० ॥ २ ॥ सच्चिद्घ-

न आनंद त्रिभुवनाचा स्वामी (२)
सर्वज्ञातर्यामी ( २ ) स चराचर
गामी ॥ जयदे० ॥ ३ ॥ संकट
समयीं प्रभु करुनीत्वरा ( २ )
भय सर्व संहारा ( २ ) तुझी श-
रणांगता तारा ॥ जयदे० ॥ ४ ॥
अंतरभावानें नाथ करूं तुझी से-
वा ( २ ) दुरित कृति आमची
( २ ) क्षमा करा देवा ॥ जयदे० ॥
॥ ५ ॥ अभिवंदन भगवंत करु-
निशदिन तुझा ( २ ) कृपा क-
रुनि द्यावी ( २ ) प्रभु सन्मति
आझा ॥ जयदे० ॥ ६ ॥ सदाचा-
र हिच मुख्य भक्ति तुमची ( २ )
सदां तुझ्या चरणें ( २ ) वृत्ति
राहो आमची ॥ जयदे० ॥ ७ ॥
जगदीश्वर जगतात तापत्रय हा-
रावें ( २ ) मनवांच्छित प्रभु आ-

मचे ( २ ) परिपूर्ण करावें ॥ जयदे० ॥ ८ ॥

ब्रह्मस्मृति उपदेश निरोपणं नाम अष्टमोऽध्याय समाप्त ब्रह्मार्पणमस्तु.

## अध्याय ९.

पद.

सगुण समर्थ सत्य । प्रभुला स्मरूं नित्य । द्या धर्म नीति व्रत । वंदुं तुज वारंवार । निरंजन निराकार । नित्य शुद्ध निर्विकार । शक्तिस तुझ्या नाहीं पार । मानु प्रभु उपकार ॥ सगुण ॥ १ ॥ भव पति भगवान । तुचपूर्ण बलवान ॥ विश्वविराजमान । वि-

नंति करा स्वीकार । ऐका प्रार्थना त्वरित । उत्तम द्यावी मज मति । पावन करा पतीत । करा तुह्मी उद्धार ॥ सगुण० ॥ २ ॥

उपासना विनंती.

हे प्रभु माझे बोलण्यावर कान दे. आणि माझे विनंतीवर ध्यान ठेव. हे माझे राजाधिराजा सृष्टिपालक माझे दुःखाचा स्वर ऐक. मी तुजजवळ आशिर्वाद मागतों. हे पूर्णब्रह्म प्रातःकाळीं तूं आमचा स्वर ऐकशील कीं, प्रातःकाळीं मी आपल्यास शुचीरभूत सिद्ध करून तुझ्याकडे मन स्थीर करून आत्म्यास लावीन. कारण तूं तो ईश्वर नव्हेस. जो दुष्ट कर्मानें संतोष मानशील. नास्तिक तुझ्या जवळ राहूं शकत नाहीं, व जे मूर्ख आहेत ते तुझे पवित्र नेत्रा स-

मोर उभे राहूं शकत नाहींत. तूं अन्यायी याजबरोबर स्वच्छतेनें राहात नाहींस. तूं त्या लोकांस जे असत्यांत वागतात त्यांचा नाश करशील. जे खुनी आणि दगाबाज यांना वाईट समजतोस, परंतु मला तुझे कृपेचे सावलीनें तुझ्या मंदिरांत ठेव. तुलाच भिऊन वंदन करीन. हे सृष्टीकर्त्या तु सत्यत्वांत माझा वाटाडी हो. माझे शत्रूचे हातांतून मला आपल्या मार्गांत घेऊन जा. कारण त्यांच्या मुखांत सत्यत्व नाहीं. त्यांचें लक्ष नास्तिकांत आहे. त्यांचा गळा नरकाचे समाधींत आहे. ते आपले जिव्हेनें आपली स्तुति करतात. हे प्रभु सत्यन्यायी तूं त्याला हालाक कर. असें व्हावें कीं, ते आपले विचारानेंच ते आपण पडोत.

त्यांचे त्यांच्याच दोषानें ते बुडोत. कारण त्यांचा भाव तुजवर नाहीं. परंतु ते सर्व जे तुजवर भाव ठेवतात ते सुखी राहोत. नित्य ते उंच स्वरानें तुझी स्तुति करोत. कारण तूं त्यांचें पालन करतोस आणि सर्व तुझे नामाचा आश्रय करणारे सुखी राहोत. याकरितां कीं, सत्याचा साह्यकारी तूंच असतोस. हे प्रभु तूं आपले पवित्र चरणाचे खालीं आश्रय देत आहेस.

स्रगधरा वृत्त.

शान्ता करा कृपाळू, प्रभुविण
नाहिं कोणी अन्य आधार आ-
मचे, आलों द्वारें तुमच्या, अति
दिन होऊनी, राखिला विश्वास
तुमचा ॥ आस धरली तुमची,
नम्रतेनें विनवू, विघ्न संताप का-

वी, पाप कापा आमचे, प्रभु क-
रावी करुणा, सन्मती नित्य द्या-
वी ॥ १ ॥ सर्वान्तर्यामि खरा
सुख बहु करता, सर्व संताप ह-
र्ता, सत्ता सर्वत्र कर्ता, प्रीति अ-
ति करुनी, प्राणात प्राण भर्ता ॥
भक्तिभावें भजू भवभय हारता,
नीति सन्मार्ग देतां, पाप कापा
आमचे प्रभु करा करुणा सन्म-
ती नित्य द्यावी ॥ २ ॥ सृष्टी शो-
भा तेजानी प्रगट फार केली पू-
र्ण शक्ती तुमची, पदार्थ मात्रे वि-
चारी तुझी सर्व शक्ति धर्म दिला
भारी ॥ व्यापून संपूर्ण स्थानीं
प्रभु त्रिभुवनांत, आहे तुमचा प्र-
ताप, पाप कापा आमचे, प्रभु
करा करुणा सन्मती नीति नित्य
द्यावी ॥ ३ ॥ आकाशीं शोभा

आहे, अप्रंपार गति आहे, गोल स्वर्ग सारा, ग्रह चक्र रवीचे, ग्रह उपग्राहाचे, सर्व नक्षत्र तारे॥ सानंदाश्चर्य पावतो, प्रभुचेच कृतीनें, आहे कला आमाप, पाप कापा आमचे प्रभु करि करुणा सन्मती नित्य द्यावी ॥ ४ ॥ जीव संरक्षणार्थें, अनेक बहु विधिथी, वस्तु सर्व केली, सत्ता सर्व व्यापी, प्रभु निज कृतीनें हेतु दिला दाखवूनी ॥ असा कारुण्य मूर्ति, शुभ गुण करता, त्याचाच करु नित्य जपा, पाप कापा आमचे प्रभु करि करुणा सन्मती नित्य द्यावी ॥ ५ ॥ सर्व स्थळी विराजमान, विभु आहे चिद्घन, हा विश्व मांगल्यकारी, श्रद्धा सद्भक्तिभावें वंदन प्रभु करू

खावी आमची, मति शुद्ध करुनी
हे प्रभु मायबापा, पाप कापा
आमचे प्रभु करि करुणा सन्म-
ती नित्य द्यावी ॥ ६ ॥ विद्या स-
द्बोध ज्ञान न दिलें त्रिशीतास
पाणी न दिलें, कार्य उत्तम न केलें,
दिनास दान द्रव्य न दिलें ॥
मानली न आज्ञा तुझी केली अ-
वगणना ते क्षमा प्रभु करावी, पा-
प कापा आमचे प्रभु करी करु-
णा सन्मती नित्य द्यावी ॥ ७ ॥

पद.

प्रभु पदे आह्मि पाय लागुनी ।
दुरित कृत्याची क्षमा मागुनी ॥ ध्रु० ॥
पतित पावना प्रेम लावावें अ-
निति दुष्कृतींतून वाचवावें ॥ प्र-
भु० ॥ १ ॥ शुभ गुण सदां प्रभु

द्यावें । मनाचें पाप काढून टाकावें । ऐका तुह्मि प्रभु नम्र विनंति । शरण राखावें हे दया निधी ॥ २ ॥ प्रभु मनोरथ मागितलें आह्मि । घटित आहे तें द्यावें तुह्मि । नका विसरूं दासाला कदा । सुनिति सन्मती दाखवावी सदां प्रभु० ॥ ३ ॥

पद.

जय जगदवंद्य जय भगवंत जय । जय परब्रह्म जय जगदीश धन्य हो ॥ ध्रु० ॥ अखंड अव्यक्त शुद्ध चिद्घन नित्य मुक्त । असंग अचित्य सत्य अतर्क्य अनन्य हो ॥ जय० ॥ १ ॥ वंदुनि वारंवार माणीय अगनीत उपकार । कृपेनें करा उद्धार । सर्व श्रेष्ठ तुह्मि ॥ जय० ॥ २ ॥ श-

क्ति आहे अति प्रबळ चित्त करा निर्मळ । द्यावें पद अचळ सर्वस्वि शरण आह्मि ॥ जय० ॥ ३ ॥

रोगनाशक उपासना.

हे देवाधीदेवा तूं आपले क्रोधानें मला शिक्षा नको देऊं. तुझे क्रोधाचे उष्णतेनें मला नम्रता नको देऊं. हे कृपाळू पित्या मजवर कृपा कर. कारण मी अशक्त आहें. हे वैद्याधी वैद्या आरोग्य दात्या मला निरोगी कर. कारण माझे अस्ती दुखत आहेत. माझे जिवासही अति दुःख होत आहे. अरे माझ्या कृपाळू प्रभु मला कितपत दुःख देशील. हे दुःखनाशक देवा माझे जिवास यांतून मुक्त कर. आपल्या करुणाचे कारणानें मला मुक्ती दे. याकरतां कीं, मृत्यूचे स्थिती तुझी स्तुति कोण समा-

थीत करील. मी स्वासोस्वास दुः-
खाचे घेत घेत थकलों. मी आपले
दुःख अश्रूनें रात्रौं माझा बिच्छाना
असा भिजवितों जसा कांहीं पाण्यानें
भिजत आहे. दुःखाचे कारणानें म-
ला नेत्रानें अंधक दिसों लागलें आ-
हे. आपल्या सर्व शत्रूचे कारणानें
माझे डोळे दिपत आहेत. सर्व ना-
स्तिकहो मजपासून दूर राहा. कार-
ण माझे पूर्णब्रह्म यानें माझे रुदना-
चा स्वर ऐकला. जग करणारानें
माझा धावा ऐकला. ब्रह्म माझी
विनंती कबूल करील. माझे सर्व
शत्रु लाजिरवाणीं आणि संकटांत
पडतील आणि फिरतील आणि ला-
जिरवाणीं होतील. ॐ तथास्तु.

पद.

विनंति प्रभु संभाळा आमची द-

यधारी ॥ ध्रु० ॥ कर जोडुनी प्रणाम करूं । मागु क्षमा तुमची । या जगांत सुख सन्मती द्यावी । अंतीं मला नका विसरूं । प्रभु आहे फार उपकारी ॥ विनंती० ॥ १ ॥ दया करुनी मनुष्य जन्म दिला । द्यावी मति शुद्ध सारी । कर्तव्य कर्म करवा विश्वाते । राहावें सदां साह्यकारी ॥ विनंती० ॥ २ ॥ प्रार्थना चित्तीं धरावी । क्षणक्षणें उपकार करावा । संकट सर्व निवारी । प्रत्युपकार केला वारंवार । अल्प जिवावरी । प्रभु तुझी सत्ता सारी ॥ विनंती० ॥ ३ ॥ षडगुणयुत भगवंत तुह्मि आहा भक्ताचें सर्व भय हारी । भक्ति करूनी निश्चय पावे प्रभु पद शुभकारी । लज्जा तुह्मी राखा आ-

मची ॥ विनंती० ॥ ४ ॥ चित्त करूं चरणार्पण नित्य । प्रभु शुचेभ नाम उच्चारी । ही स्वल्प वाक्यानें विनंति केली । ती तुह्मि घ्यावी स्वीकारूनी । कृति सर्व विचारी आमची ॥ विनंती० ॥ ५ ॥

अभंग.

आह्मा आपुलें नावडे संचित ।
चरफडे चित्त कळवळयानें ॥ १ ॥
न कळतां झाला खोळंबा मार्गी ।
जनी झालों जगा बहुरूपी ॥२॥
कळो आलें बरें उघडले डोळे ।
कर्णधार मिळे तरी बरें ॥ ३ ॥
तुका ह्मणे व्हाल ऐकत करुणा ।
तरि नारायणा उडी घाला ॥४॥

कथा.

पूर्व काळाचेठायीं हिरण्यकशप नामक एक मूर्तिपुजक होता. तो मु-

लतान देशाचे राज्याचा उपभोग घेत असे. त्यास एक पुत्र झाला त्याचें नांव प्रल्हाद होतें व हा ब्रह्मज्ञानी होता. याचें वय विद्याभ्यासास आल्या कारणानें गुरु जवळ विद्याभ्यासास पाठविलें. गुरूनें प्रथमच ॐ नमसिधं हा धडा दिला. या पुढील धडा गुरुजीनें दिला त्या समयीं प्रल्हादानें प्रश्न केला हे गुरुजी पुढील धडा समजत नाहीं; कारण पूर्व धडा जो दिला त्यापुढें जगांत कांहींच मला दिसत नाहीं. मग तुह्मी काय शिकविता हें समजत नाहीं. यावरून गुरुजीस फारच विचार पडला. सरते शेवटीं एके दिवशीं गुरुजी प्रल्हादास समागमें घेऊन राज मंदिरांत आला. हें हिरण्यकशपानें पाहून गुरुजीस विचारता झा-

ला हे गुरुजी आपण काय निमित्त पुत्रास आणले. गुरुजी ह्मणतात हे राजन्न तुझा पुत्र विद्याभ्यास करीत नाहीं. राजा विचारता झाला. माझा पुत्र जड बुद्धि आहे कीं काय. गुरुजी ह्मणतात. हे राजन्न तुझा पुत्र बुद्धिवान आहे, परंतु ॐनामा याचे पुढील धडा दिल्यास ह्मणतो कीं, या जगांत यापुढें कांहींच नाहीं, मग तुह्मी मला काय शिकविता. हें राजानें ऐकून तो दुष्ट मूर्तिपुजक बोलता झाला हा माझा पुत्र फारच दुष्ट निघाला व नाहीं तें नांव मुखानें घेतो. आतां अशा दुष्टास काय करावें. हा पुत्र नसेल तरी उत्तम आहे. असा विचार मनांत करून शेवकास तो नास्तीक बोलता झाला कीं, तुह्मी महालांत जाऊन या पु-

त्राचे मातोश्रीस बोलावून आणावें. शेवकानीं राज आज्ञेप्रमाणें बोलावून आणलें. हा असुर मूर्तिपुजक आपले स्त्रीस बोलता झाला. हे प्रिये आपले वंशांत असा दुष्ट कोणीही जन्मला नाहीं. यास मारून टाकावें हें उत्तम आहे. नाहींपेक्षां आपले कुळाचें नांव नाहींसें होईल. उदाहरण, जसें हल्लीं हिंदु ब्राह्मोस ह्मणतात तसें. असो, हें वचन राजाचें ऐकून तीस फारच दुःख वाटलें, परंतु तिचा नाइलाज या कारणानें स्तब्ध राहिली. असा जो ब्रह्म भगत यास मारण्याचे हेतूनें दुष्ट राजास पुत्राची दया न येतां त्यानें जें विष लागलेच प्राण घातक असें आपल्या स्त्रिचे हातीं विष पात्र देऊन बोलता झाला हे प्रिये हें उदक तुझे

पुत्रास दे. ( हार हार ) हा नास्तीक यास पूर्णब्रह्म याचो भीति न येतां घोर कर्म करण्यास प्रवृत झाला. ती मातुश्री हाहाःकारानें रुदन करीत होत्साती भ्रतार आज्ञेनें विष देती झाली. त्या एकनिष्ट ब्रह्म भक्तानें ब्रह्म स्मरण करून विष प्राशन करिता झाला. तें प्राणहारक विष भक्ति बळानें ब्रह्म साह्यानें अमृततुल्य सीतळ झालें. हें त्या मूर्तिपुजक दुष्टानें पाहून बोलता झाला कीं, हा माझा पुत्र कपट विद्या जाणत आहे. तेणेंकरून विषानें यास कांहींच केलें नाहीं असें मनांत आणून दुष्टबुद्धि प्रधानास विचारता झाला कीं, हे प्रधानजी या पुत्राचा नाश कसा करावा. तो नास्तीक मूर्तिपुजक निर्दय प्रधान बोलता झाला. हे महा-

राज यास मोठे डोंगरावरून ढकलून द्यावें ह्मणजे याचा नाश होईल. दुष्ट-बुद्धि राजानें आपले समक्ष तसेंच केलें. एक निष्ठ ब्रह्मभक्त यास डोंगरा-वरून ढकलून दिलें. तो ईश्वर नाम-स्मरणांत निमग्न होता. त्यास त्या डोंगराचे दगड मखमाली प्रमाणें नरम लागले, व ब्रह्म सत्तेनें सुरक्षीत राहिला. हें पाहून त्या असुर मूर्ति-पुजकास फारच क्रोध आला. जसा कांहीं सुकरास क्रोध येतो. त्यानें तत्क्षणी शेवकास आज्ञा देऊन लां-कडांचा समावेश करून त्यास अग्नी दिला तो अग्नी चैतन्य झाल्यावर या ब्रह्मभक्तास उचलून अग्नींत टा-किलें. हा ईश्वर नामस्मरण करीत असतां अग्नींतून बाहेर निघाला, व तो अग्नि त्या ब्रह्मभक्ताचे आंगास

चंदनाप्रमाणें सीतल लागला. यावरून हिरण्यकशपास राग आला. पुत्रास विचारता झाला कीं, ज्याचें नांव तूं घेतोस तो कोठें आहे, असें विचारण्याचें कारण हिरण्यकशप हा ईश्वराचें नांव मुखानें घेत नसे. केवळ मूर्तीचें नांव घेत असे. या कारणानें त्यानें पुत्रास असा प्रश्न केला होता. ब्रह्मभक्त प्रल्हाद यानें उत्तर दिलें. ज्याचें नांव मी घेतों तो माझा रक्षक जळीं काष्टीं पाशाणीं सर्व स्थळीं व्यापून उरला आहे. असें ह्मणतांच हिरण्यकशप यानें दुष्टबुद्धीनें महालाचे खांबास लाथ मारली. लाथ मारतांच ब्रह्मशक्तीनें त्यांतून एक पुरुष उत्पन्न होऊन त्याणें हिरण्यकशपास घोर नरकाप्रत पाठविलें. त्याच मनुष्यास हिंदु ईश्वर ह्मणून मा-

नतात. सारांश एका ज्ञानी पुरुषाची ह्मण आहे. शत्रु काय करणार आहे, जर कृपाळू प्रभु आहे. याच प्रमाणें प्रल्हादाचें रक्षण ब्रह्म यानें केलें. आणि हिरण्यकशपास घोर नरकाप्रत पाठविलें. आतां पूर्ण जाणावें कीं, ब्रह्मभक्ताचाच नित्य रक्षक असतो.

पद.

हरिल अघभार करिल भवपार ।
विश्वाचा आधार । गाहो गाहो
जगदोद्धार ॥ ध्रु० ॥ सुविमल-
चित्तिं भाव करा दृढ । सोडुनि
विषय आसार ॥ विश्वाचा० ॥१॥
सत्संगातें जोडुनि प्रेमें । भजन
करा अनुवार ॥ विश्वाचा० ॥ २ ॥

आर्ती.

जयदेव जयदेव जय करुणासिंधु ।

जय करुणासिंधु । कर जोडोनी प्रभु तुला (२) चरणँ नित्य वंदु ॥ जयदे० ॥ १ ॥ तत्सत् ब्रह्म महेश मुक्तिचा दाता (२) व्यापून राहिला सत्तेनें (२) विभु सविता धाता ॥ जयदे०॥२॥ प्रातः समयीं परमेश प्रभु पदास वंदु (२) सत्कर्म करण्यास (२) विधि मी आरंभु ॥ जयदेव० ॥ ३ ॥ सायंकाळ सुरेश सकळ क्रिया अमची (२) तुज चरणें अर्पुनि (२) मागु कृपा तुझि ॥ जयदेव० ॥ ४ ॥ सर्वात्मा सर्वेश सुखशांति द्यावि (२) कृपा करुनी करुणानिधि (२) कष्ट सकळ कापी ॥ जयदे० ॥५॥ केला बहु उपकार असा नित्य करावा (२) दोष दयानिधि अ-

मचा ( २ ) चित्तांत न धरावा ॥ जयदे० ॥ ६ ॥ अवलंबन आधार सत्य प्रभु तुमचा ( २ ) शरणांगत शेवकास ( २ ) नित्यही उद्धारा ॥ जयदे० ॥ ७ ॥

ब्रह्मस्मृति उपदेश निरोपणं नाम नवमोऽध्याय समाप्त ब्रह्मार्पणमस्तु ॐ ह्मब्र०.

नमःपुरस्तादथपृष्टतस्ते नमोस्तुतेसर्वतएवसर्व ॥ अनंतवीर्या मितविक्रमस्त्वं सर्वसमाप्नोषिततोऽसिसर्वः ॥

या मंत्रेकरून या जागीं पूर्णब्रह्म यास नमस्कार करावा.

---

# अध्याय १०.

पद.

परम प्रभु तुमची । कळा आहे अपार । यश गुण महिमा । कोणी पावला न पार ॥ पर० ॥१॥ स्तवन करि अह्मि हे । प्रार्थनाही उच्चारी । विहित प्रभु असेल जें। तेंच घ्यावें स्वीकारूनी ॥ पर० ॥ २ ॥ शरण आहे तुमचे । वंदी मी वारंवार । प्रभु अति करुणा । मानोनी बहु उपकार ॥ पर० ॥ ३ ॥ नाहिं नाहिं नाहिं कोणि । प्रभु अश्रय आमचा । कर धरूनी अमचा हा । विश्वसिंधु तारा॥ पर० ॥ ४ ॥

अभंग.

आतां गाउं तुज ओविया मंगळी।

उपासना ४ अध्याय १०.

करूं गदारोळी हरि कथा ॥ १ ॥
होसि निवारिता आमुचें सकळ ।
भय तळमळ पाप पुण्य ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मी लाडिकीं लेकरें।
न राहो अंतरें पायाविण ॥ ३ ॥

पद.

घडि घडि हरिशीं स्मर मनारे ।
हे मना तुज किति शिकवूं ॥ध्रु०॥
अमोल्य नरतनु जाइल जेव्हां ।
मग काय करिशि मान धनारे॥
घडि० ॥ १ ॥ सांडुन सुखकर
स्मरण हरीचें । आर्जविशि कि-
ति धनारे ॥ घडि० ॥ २ ॥ पति-
तपावन भावें स्मरतां । चुकतिल
दंड यातनारे ॥ घडि० ॥ ३ ॥

उपासना शत्रु नाशनार्थ.

हे जगदीश्वर माझे प्रभु आमचा भरंवसा तुजवर आहे. मला सर्व

याजपासून जे माझे पाठी पडले आहेत त्यांजपासून सोडीव आणि वाचीव. असें न व्हावें कीं, शत्रु मला सिंव्हाप्रमाणें खावोत. ज्या समयीं माझा वाचविणारा कोणी नाहीं असें पाहून माझे रेजे रेजे करोत. हें संकट नाशन दुःखहारक प्रभु केव्हां ते असें करोत. जर माझे हातून शत्रुत्व झालें असेल अथवा ज्यानीं मजवर उपकार केले आहेत, व मी त्यांजबरोबर शत्रुत्व केलें असेल तर मी त्यांस जें विनाकारण माझे वैरी आहेत त्यांस सोडलें आहे. ज्यानीं मजवर उपकार केले त्याशीं अपकार केला आहे ते माझा प्राण घेवोत. अथवा मला जमीनदोस्त करोत. अथवा माझी अब्रू नाहींशी करोत. हे पूर्णब्रह्म तूं आपले क्रोधांत ऊठ आणि

माझे शत्रूंचा जो त्रास आहे त्या करतां आपल्यास उंचीव. याजकरतां कीं, तुझी जी आज्ञा आहे मजकरतां जागृत हो. आणि लोकांचा समाज तुझे आसपास फिरेल. याकरतां तूं त्यासाठीं आपल्यास उंचीव. पूर्णब्रह्म लोकांचा न्याय करील. हे न्यायकारी प्रभु जसें माझें सत्यत्व आणि माझी भक्ति आहे तसा तूं न्याय कर. दुष्टाचें दुष्टत्व अगदीं नाहींसें कर. आणि सत्यास बळवान कर कीं, सत्य प्रभु सर्वांचे मनांची आणि समाजांची परीक्षा करतो. मला ईश्वराचा आश्रय आहे. आणि त्यांस ज्याचें मन स्थीर आहे त्यास मोक्ष देतो. ईश्वर इमानदारांचा न्याय करतो. आणि जगदीश्वर नित्य दुष्टावर क्रोधी होतो. जर

तो दूर न होईल तर प्रभु आपलें खड्ग त्याजवर तेजस्वी करील. त्यानें तर आपले धनुष्यास बाण लावला आहे, आणि सिद्ध केलें आहे. आणि त्यानें नास्तीकाकरितां मृत्युची सामोग्री सिद्ध केली आहे. पहा त्यास नास्तिकत्वाचें दुःख होत आहे. आणि त्यास पापाचे गर्भ राहिले. आणि असत्यास जाणतो. त्यानें खळगा खोदला आणि खळगा केला. जो लोकांस दाखवीत होता तोच स्वतः पडला. त्याचें पाप त्याचे मस्तकावर पडेल. तसेंच त्याचा जुलूम त्याचेच खोपडीवर पडेल. मी ब्रह्म आज्ञेप्रमाणें त्याचा धन्यवाद करीन. आणि ब्रह्म जो सर्वांहून श्रेष्ठ आहे, ज्यासमान अन्य कोणी नाहीं त्याचें नाम गाईन.

पद.

प्रभु आहे अति दयाल । दिन
जन प्रतिपाल । शरण तुमचे
आह्मि । भवसिंधु तारा ॥ ध्रु० ॥
करा सर्व उत्तम काज । शेवका-
चीं राखा लाज । अवगुण अप-
राध । लक्षांत नका धरूं ॥प्रभु०॥
१ ॥ भक्ताचा समाज आज ।
मिळुनि माहाधिराज । विनति
करितों प्रभु । ते तुह्मि स्विका-
रा ॥ प्रभु० ॥ २ ॥ कृपाकरी कर-
धरा । अवगुण नका आणूं मना।
चित्ताचे क्षमावी क्लेश । शांतिनें
वृत्ति करा ॥ प्रभु० ॥ ३ ॥

पद.

दीन जनोद्धार । मन्मन रमुदे
गुणगानी तुझ्या निशिदिनी ॥
ध्रु० ॥ अतुल दुरिताचा संभार ।

पदरि वाहे । रुचिनसे तिळभर शाश्वत सुखा ठायी मूढा ॥ दीन० ॥ १ ॥ निबिड मनी झाला आंधार । विषयीं दृष्टि । मज दिसे न सुखद स्वरूप जाचलों तैं फार ॥ दीन० ॥ २ ॥ सकल मंगलाचें भांडार । सदय दाता । असतां तूं अन्यत्र झिजत फिरे शुद्धि लागी ॥ दीन० ॥ ३ ॥ सत्पथ त्यजियला यासाठीं । मज न सांडी । घे पदरीं दिनाला पावन करी कृपेनें ॥ दिन० ॥ ४ ॥

ललित छंद.

जगतनाथ नम्र होउनी आह्मि, नम्र भावें वंदिये तुह्मा ॥ श्रवण करा स्वल्प प्रार्थना प्रभु कृपानिधे हे दयाघना ॥ १ ॥ विषय भोगांत राखुनी वृत्ति नाहीं के-

ली अह्मि भक्ति कधीं ॥ शरण
येउनि मागियली प्रभु कृपानि-
धिरे दयाघना ॥ २ ॥ सबळ श-
क्ति आहे तुझी प्रभु कधीं कळत
नाहीं ती विभु ॥ सकळ कर्माचा
साक्षि चिद्घना प्रभु कृपानिधेरे
दयाघना ॥ ३ ॥ ग्रहतारे गगनीं
जे दिसे भ्रमण शक्ति जी सर्वत्र
विषे ॥ प्रभु चमत्कारिक दिसे म-
ना प्रभु कृपानिधेरे दयाघना ॥४॥
जगत सृष्टित चातुर्यें अति नेम
पूर्वक आहे सर्व कृति ॥ जिवाव-
रती केली बहु दया प्रभु कृपानि-
धेरे दयाघया ॥ ५ ॥ मनुष्याला
दिली श्रेष्ठ सर्वही सत्य अस-
त्याची ज्ञान मति ॥ दूर करा
प्रभु दुष्ट वासना प्रभु कृपानिधेरे
दयाघना ॥ ६ ॥ सकळ प्राणाचा

उपासना ४ अध्याय १०.

मातापितारे विदित आहे तुला सर्वरे ॥ तथापि संभाळा दीन याचना प्रभु कृपानिधेरे दयाघना ॥ ७ ॥

उपासना ब्रह्मस्तुति.

हे जगदीश्वर आमच्या राजाधिराजा सर्व सृष्टींत काय आहे. एक तुझें नांव सर्वांत श्रेष्ठ आहे. आणि उत्तम आहे. आपली शक्ति आकाशांत प्रसिद्ध केली आहेस. तूं आपले शत्रुकरतां जे तुजपासून विरुद्ध आहेत त्यांजपासून बदला घेतोस. आणि अज्ञान बालक याजकडून आपली स्तुति करवितोस. ज्या समयीं मी तुझे आकाशाकडे दृष्टी करून तुझे हस्तकौशल्यास व चंद्रसूर्य आणि तारे जे तूं उत्पन्न केले आहेत कीं, ज्यांस पाहून मनुष्य तुझें ध्यान

करोत. आणि मानवी तूं उत्पन्न केलें जें त्यास पाहून तुजकडे लक्ष लावोत. तूं कांहीं अंशीं देवतापेक्षां त्यांस कमी केलें आहेस, परंतु ज्ञान सुखाचा मुगूट त्यांचे मस्तकीं ठेवला आहेस. तसेंच तूं उत्पन्न केले पदार्थांवर त्यांस सत्ता दिली आहेस. तसेंच सर्व त्यांचे स्वाधीन केलें. सारीं चतुःषपाद जनावरें, आकाशांत उडणारे पक्षी आणि पाण्यांतील मासे इत्यादि. हे पूर्णब्रह्म या जगांत काय अमोल्य आहे. तुझें पवित्र नामच अमोल्य आहे.

अभंग.

मूर्ख तो संसारी माझें माझें करी ।
मृत्यु बरोबरी हिंडतसे ॥ १ ॥
हिंडतसे काळ संगाती सरीसा ।
धरी भरंवसा नेणोनिया ॥ २ ॥

नेणोनिया प्राणी संसाराशीं आला।
आला तैसा गेला दैन्यवाणा ॥ ३ ॥
दैन्यवाणा गेला सर्वही सोडोनी।
ठेविलें जोडुनी जनांलागीं ॥ ४ ॥
लागलेली मळी दोषाची सुटेना।
आसक्ती तुटेना अंतरीची ॥ ५ ॥
अंतरीची मूर्ति अंतरली दूरि।
कदाकाळीं हरी आठवेना ॥ ६ ॥
आठवेना अंतकाळी हरीविण।
धन्य तें मरण दास ह्मणे ॥ ७ ॥

पद.

मंगळ आहे नाम तुझें। मंगळ आहे स्थान तुझें : मंगळ आहे कर्म तुझें। त्रिभुवन नाथ तूं ॥ मंग० ॥ १ ॥ तुज पद आहे वरद। कृतकर्म फळप्रद। अव्यक्त अखंड एक। नित्य अबाध तूं ॥ मंग० ॥ २ ॥ असा तुं प्रभु म-

हान । सर्व विराजमान । अंतर साक्षी तूं । जाणतोस तूं सर्व ॥ मंगळ० ॥ ३ ॥ अवगुण आहेत आगाध । गाणित नाहीं नाथ । तारण आहे तुझे हाथ । प्रभु मातापिता तूं ॥ मंग० ॥ ४ ॥

उपासना ब्रह्मस्तुति.

हे पूर्णब्रह्म मी आपल्या मनापासून तुझी स्तुति करीन. मी तुझें जें अगाध कर्म आहे त्याचें वर्णन करीन. मी तुजपासून हरएक समयीं आनंदांत राहीन. मी तुझें नांव जें अति उत्तम आहे त्याची स्तुति करीन. माझे शत्रु मजकडे फिरले तेव्हां त्यानीं ठोकर खाल्ली आणि तुझे समक्ष दुःखी झाले. माझा न्याय आणि कज्या चुकविला. तूं न्याय सिंव्हासनावर बसून सत्य न्याय केला.

तूं दुसरे जातीस दुष्टत्व दिलें. तूं नास्तिकांचें निर्मूलन केलें. अरे हे शत्रु अखेरीस तुझी खराबी झाली. तूं नगरें उजाड केलीं. ज्याचें वर्णन त्याचे समागमें गेलें, परंतु जगदीश्वर नित्य राहाणारा आहे. तो आपले न्यायाचे सिंव्हासनारूढ आहे तो सत्यत्वानें जगाचा न्याय करील. आणि न्याय रीतीनें न्याय करील. पूर्णब्रह्म अनाथाचा आश्रय आहे. आणि दुःखाचे समयींचा आश्रयदाता आहे. जे तुझे नामाचें स्मरण करतात व तुजवर भाव ठेवतात हे ब्रह्म त्यांस तूं आपला दास जाणून दूर करीत नाहीं. परमात्मा जो सर्वांचे हृदयांत वास करतो त्याचें गायन करा. सृष्टींत त्याचे अद्भूत कामाचें वर्णन करा. ज्या समयीं तो खुनाचा

प्रश्न करील त्या समयीं खुनीचें स्मरण करील. तो गरिबांचे फिर्यादीस विसरत नाहीं. हे कृपाळू मजवर कृपा कर. या दुःखांत जें दुःख माझे शत्रुपासून मला झालें याजवर दृष्टी कर. मला मृत्यूच्या पाशांतून सोडविणारा आहेस; कारण सर्वांच्या द्वारावरतीं तुझ्या गुणाचे वर्णन करीन. कारण तुझेच कृपेनें मी आनंद करीन. नास्तीक त्या कुव्यांत जो त्यानें खोदला होता त्यांतच ते पडले. जें त्यानीं गुप्त ठेविलें होतें त्यांतच त्यांचे पाई फसले. न्यायी प्रभु जें आपले न्यायानें करतो तेणेंकरूनच तो प्रसिद्ध आहे. नास्तिक आपले हातानें केलेले कर्मांतच फसले आहेत. पापी नरकांत घातले जातील. त्या सर्व जाती ज्या पूर्णब्रह्मास विसरल्या आहेत.

उपासना ४ अध्याय १०.

अभंग.

कर्ता एक देव तेणें केलें सर्व ॥
तयापाशीं गर्व कामा नये ॥ १ ॥
देह तें देवाचें वित्त कुबेराचें ॥
तेथें ह्या जिवाचें काय आहे ॥ २ ॥
देता देवविता नेता नेवविता ॥
कर्ता करविता देव एक ॥ ३ ॥
निमित्ताचा धनी केला असे प्राणी ॥
पाहातां निर्वाणीं देव एक ॥ ४ ॥
लक्ष्मी ही देवाची सर्व सत्ता त्याची॥
त्याविणें जिवाची ऊर्मी नाहीं ॥ ५ ॥
दास ह्मणें मना सावध असावें ॥
दुश्चित नसावें कदाकाळ ॥ ६ ॥

अभंग.

ऐसें कैसेंरे सोवळें ॥ शिवतां होतसे ओवळें ॥ १ ॥ स्नान संध्या टिळे माळा ॥ पोटीं क्रोधाचा उमाळा ॥ २ ॥ नित्य दंडीतोसी

देह ॥ परी फिटेना संदेह ॥ ३ ॥ नित्य नेम खटाटोप ॥ मनीं विषयाचा जप ॥ ४ ॥ बाह्य केले निरफळ ॥ देह बुद्धीचा विटाळ ॥५॥ रामदास दृढ भाव ॥ तयाविण सर्व वाव ॥ ६ ॥

पद.

ब्राम्हु दयाळ कसे ॥ राजा रंक जया सरिसे ॥ ध्रु० ॥ देउनि भेटी तोडिती माया ॥ नेउनि दाविति निजपद ठाया ॥ १ ॥ ब्राम्हु० ॥ श्रवणीं पाजुनी अमृतवाणी ॥ नेउनि दाविती चिन्मय खाणी ॥२॥ ब्राम्हु०॥ नामाचें अभिनव लेणें ॥ लेवविलें मज पूर्ण कृपेनें ॥ ३ ॥ ब्राम्हु० ॥

कथा.

पूर्व काळाचे ठायीं परशराम नाम-

क एक गृहस्थ ब्राह्मण असे. यास-च हिंदु ईश्वरी अवतार सहावा मान-तात. या गृहस्थानें पुरुषहत्या, स्त्री-हत्या, बालहत्या, मातृहत्या केल्या या कारणानें त्यास स्वर्ग प्राप्त न होतां अधोगतीस गेला. वाह-वारे हिंदु अनुयायी. ज्यास तुह्मी ईश्वर मानून ज्याची तुह्मी पूजा कर-तां तो बिचारा स्वतः अधोगतीस गे-ला आहे. व त्याचीं कर्मे पहा किती अयोग्य आहेत. ज्या तुमच्या देवा-चें कृत्य असें जो व तुमचा देव अधो-गतीस आहे तो तुमचा देव तुह्मास कसें तारील याचा विचार करा. सा-रांश अवतार त्यासच मानलें पाहि-जे. ज्यामध्यें सत्वगुण आहेत, उत्तम कर्म ज्याचें आहे अशासच अवतारीक पुरुष ह्मणावें. ज्यास ई-

श्वर हिंदु मानतात ते ईश्वर कधीं होत नाहींत, व कितीएक मनुष्यांस हिंदु अवतारीक मानतात त्यांस अवतारीक ही मानतां येत नाहीं. ईश्वर एकच आहे, आणि तो कधींही जन्म घेत नाहीं.

अभंग.

शरण जावें नारायणा ॥ सत्य मानावें निराकारा ॥ १ ॥ नाना मतीं काय चाड ॥ करणें सत्याचा निवाड ॥ २ ॥ ज्ञान भक्तीनें शिणवावें ॥ भक्ति तयेशीं ह्मणावें॥३॥ रामी रामदास सांगे ॥ सर्वकाळ संत संगें ॥ ४ ॥

आर्ती.

जयदेव जयदेव जय जगदाधीश जय जगदाधीशा ॥ प्रकृति परा परमेशा ( २ ) प्रणमु प्रभु ईशा ॥

जयदेव० ॥ १ ॥ साक्षि तूं सर्वत्र सत्ताथकिंव्यापी ( २ ) कृपा करी सेवकावर ( २ ) मति निर्मल द्यावी ॥ जयदे० ॥ २ ॥ नामिन मी नमिन मी नाथ पाय तुला लागूं ( २ ) प्रभु द्यावा पुरुषार्थ ( २ ) हा शुभवर मागूं ॥ जयदे० ॥ ३ ॥ माझा अपराध चित्तांत नका धरूं ( २ ) कृपाघना करुणा करुनी ( २ ) पाप क्षमा करावी ॥ जयदे० ॥ ४ ॥ प्रभु आहे परम कृपाळू कार्य सफल करवा ( २ ) संरक्षण करा आमचे ( २ ) कष्ट सकळ हारा ॥ जयदे० ॥५॥ परमेश्वर आस्तित्व सत्य करुनी माना ( २ ) श्रद्धा भक्ति उपासना ( २ ) शुभ अर्चन जाणा ॥ जयदे० ॥ ६ ॥ पराभक्ति प्रभु

ध्यान हृदयात धरा ( २ ) अभिवदन पूर्वकहि ( २ ) करूं आर्चा तुझी ॥ जयदे० ॥ ७ ॥ हे उत्तम उपचार अर्पू तुजचरणें ( २ ) अर्यांगथि अर्चन ( २ ) करूं राहूं प्रभु शरणें ॥ जयदे० ॥ ८ ॥

ब्रह्मस्मृति ईश्वर अवतार खंडन निरोपणं नाम दशमोऽध्याय समाप्त ब्रह्मार्पणमस्तु ॐ ह्मब्र०.

---

## अध्याय ११.

पद.

धांव विभो करुणाकर हरी देव दयानिधे ॥ ध्रु० ॥ हे करुणाकर दीन-जनोद्धार ॥ हा भवदुस्तर

यांतूनि उद्धार ॥ धांव० ॥ १ ॥ काममदादीक गांजिती हे अती॥ धांव जगपती सेवक-हितकर ॥ धांव० ॥ २ ॥ जनन-मरण-भय-हरण करि त्वरें ॥ चरणीं शरण दृढ आम्हु किंकर ॥ धांव० ॥ ३॥

अभंग.

देह विटाळाचा गोळा ॥ कैसा होतोशी सोंवळा ॥ १ ॥ तुज कळेना विचारू ॥ ऐशीयासी काय करूं ॥ २ ॥ दृढ केला अभिमान ॥ तेणें जहालें बंधन ॥ ३ ॥ रामदास ह्मणें हरीविण ॥ केला तितुकाही शिण ॥ ४ ॥

उपासना नास्तिक नाशनार्थ.

हे पूर्णब्रह्म तूं आमचेपासून दूर कां उभा राहातोस. दुःखाचे समयीं तूं आपल्यास आह्मापासून कां लप-

वितोस. नास्तिक आणि दुष्ट फार दिवसांपासून अनाथांस फार सतिवतात. त्यांना त्यांच्याच विचारानें तूं धर. दुष्ट आपले आयुष्यावरच मगरूरी करतात. आणि लोभ जें कर्म ब्रह्म यास आवडत नाहीं तेंच कर्म करतात. नास्तिक आपले महत्वानें काळजी करीत नाहींत, आणि ईश्वर कोणतेही प्रकारें त्यांचे लक्षांत नाहीं. यांचा मार्ग हमेशा खळग्यांत आहे. तुझा न्याय त्यांचे लक्षांतून लपलेला आहे. तो आपले सारे शत्रूंशीं आकडींत असतो. तो आपले मनांत ह्मणतो कीं, मला कांहीं भीति नाहीं. माझे पिढानपिढींत संकट पडणार नाहीं. त्यांचे तोंड धिःकारानें आणि दयेनें आणि कुचिष्टेनें भरलेलें आहे. त्यांचे जिव्हेंत नुकसान दुष्टत्वच आहे. आ-

णि तो वस्तीचे दुष्ट स्थळांत बसून निर्दोषी यांस मारण्याचे विचार करतात आणि मारतात. त्यांचीं नेत्रें गरिबांवर लागलेलीं आहेत. ते दुष्ट बुद्धीनें लपून व्याघ्राप्रमाणें घातांत लागलेले असतात कीं, गरिबास आपले डावांत आणून धरतात. तो दबून बसलेला आहे कीं, मी आपल्या बाहूंच्या जोरानें त्यांस पाडीन. तो आपले मनांत ह्मणतो पूर्णब्रह्म विसरला आहे. तो कांहीं पाहात नाहीं. हे प्रभु देवाधीदेवा जाग्रत होऊन हे पूर्णब्रह्म तुझा पवित्र हस्त लांबीव आणि तुझे दासास विसरूं नकोस. नास्तिक पूर्णब्रह्म याचा अपराध कां करतात. ते आपले मनांत ह्मणतात कीं, पूर्णब्रह्म आह्मास विचारणार नाहीं. तूं तर पाहिलें आहेस तुझे

दासास आणि नास्तिकास आणि तूं सर्वांवर नजर करतोस, कारण कीं, तूं आपले हातानें शिक्षा दें. तुझे दासानें आपल्यास तुझ्या स्वाधीन केलें आहे. आनाथांचा साह्यकरता तूं आहेस. दुष्ट आणि नास्तिक यांची बाजू तूं तोड. असें कीं, धुंडल्यानेंही त्यांचें नास्तिकत्व मिळूं नये. जगदीश्वर अनादी पासून अन्तपर्यंत आहे. उत्तम उत्तम राजेया महान पृथ्वीवरून नाहींसे झाले. हे पूर्णब्रह्म तूं अनाथांचें ऐकतोस. तूं त्यांचे मनास निश्चय देशील. आणि पवित्र कर्णानें ऐकशील; कारण बेवारस आणि गरीब यांचा न्याय करशील. सबब कीं जमिनीचीं मनुष्यें पुनः जुलूम न करोत.

उपासना ९ अध्याय ११.

वृत्त स्त्रगधरा.

विश्वाधारा आपारा नम्र विनंति
तुला वंदु पाद तुझे। प्रेरोनि स-
द्धर्म नित्य नका कधीं फसवूं वा-
सना दुष्ट नादें ॥ संसाराचा सा-
गर प्रभु कर धरुनी धर्म नौकेनें
तारा। वंदु विश्वनाथा विनंति
करूं तुला कष्ट सर्व निवारा ॥१॥
जाणा अंतस्थ मना सांगूं प्रभु
तुला करूं विलापा । विश्वासें
राहूं भवपति आह्मी सर्वदां शां-
ति द्यावी ॥ आराधना एक चित्तें
प्रभु मज हृदये भक्तिश्रद्धा भरा-
वी । वंदु विश्वनाथा विनंति करूं
तुला कष्ट सर्व निवारा ॥ २॥ क-
र्म खोटें करी तो अवहीत जा-
णीतो मार्ग तसाच चालितो।
तथापि विश्वास राखितो प्रभु प-

वित्र पदाचें ध्यान चित्तांत धरि-
तो ॥ धरूनि आमची दयारे तत्त-
क्षण करावें नाश सर्व विकारा ।
वंदु विश्वनाथा विनंति करूं तुला
कष्ट सर्व निवारा ॥ ३ दोष आ-
मचे बहुत आहेत अगणित अति
क्रूरगुणे । मागु तुजशीं क्षमारे
अशक्त कृतीनें एक तुलाची ॥
शरणागंताशीं निभवा प्रतिदि-
वशीं प्रभुचें मानु उपकार । वंदु
विश्वनाथा विनंति करूं तुला कष्ट
सर्व निवारा ॥ ४ ॥ तारा तारा
प्रभु आह्मा हास्त धरूनि विश्व-
सिंधूतुनि तारा । दुजा नाहीं अ-
सरा तुजविण विभुरे विघ्नें सर्व
हारा ॥ सत्य आश्रय तुझा दिन
जन आह्मा नका कधीं विसरूं ।
वंदु विश्वनाथा विनंति करूं तुला

कष्ट सर्व निवारा ॥ ५ ॥ विसरुनि संवसार मायेला भवपति आह्मी भ्रान्तित पूर्ण मानु । सत्य मानोनी प्रपंचा अतिशय मदानें मूर्ख व्यर्थ विसरूं । साष्टांगें पायलागु वंदन करोनी वृत्ति आमची सुधारा ॥ वंदु विश्वनाथा विनंति करूं तुला कष्ट सर्व निवारा ॥ ६ ॥

अभंग.

एक देव आहे खरा । माये नाथिला पसारा ॥ १ ॥ हेचि विचारें जाणावें । ज्ञानि तयाशीं ह्मणावें ॥ २ ॥ रामदासाचें बोलणें । स्वप्नापरी जाई जिणें ॥ ३ ॥

अभंग.

नाहीं एक उपासना । कैची भक्तिची वासना ॥ १ ॥ नाहीं निश्चय अंतरीं।मन फिरे दारोदारीं॥२॥

ज्याशीं नाहीं एक देव । अनेक मुर्ती ठायीं भाव ॥ ३ ॥ नाना-कार झालें मन । कैचें निष्ठेचें भजन ॥ ४ ॥ रामी रामदास ह्मणें । नीराकारा वीण सर्व सुणें ॥ ५ ॥

पद.

कोठें न जावें ॥ श्रीहरिलागीं भजावें ॥ ध्रु० ॥ दोचोंदिवसाघाटां ॥ भरडुनि उदक करूनियां प्यावें ॥ कोठें ० ॥ १ ॥ समयीं आल्या अतिताशीं ॥ यथाशक्ति भोजन द्यावें ॥ कोठें ० ॥ २ ॥ उठतां बसतां धामीं ॥ हरिशीं ध्यातची जावें ॥ कोठें ० ॥ ३ ॥

पद.

कशाला माळ गळा घालावी ॥ ध्रु० ॥ ह्रदयीं काम हरिनाम नये मुखीं ॥ परधनाशीं मन लावी ॥

कशाला ० ॥ १ ॥ भस्म लल्लाटीं तनु कष्मलजितमती ॥ होउनि चित्त न तो लावी ॥ कशाला० ॥ २॥ जटाजूट पुट पुट अधर पुटीं॥ कुटें जनाचीं बोलावीं ॥ कशाला० ॥ ३ ॥ ब्रह्म भजन मनीं नसतां नर ॥ तनु खराशीं तोलावी ॥ कशाला० ॥ ४ ॥

उपासना भक्तिभाव.

माझा भरंवसा जगदीश्वरावर आहे. तुह्मी कसें ह्मणतां कीं, पक्षाप्रमाणें आमचा प्राण नाश पावेल. याकरतां कीं, दुष्टानीं आपले कमानीस तीर लावला आहे. कारण कीं, गुप्तपणानें ब्रह्म दासास मारावें. ज्या समयीं बीज बिघडून गेलें. मग सत्यवादी काय करणार. पूर्णब्रह्म आपल्या पवित्र स्थानीं आहे. पूर्णब्रह्म

याचें सिंव्हासन आकाशांत आहे. हा पाहातो आणि मनु वंशाची परीक्षा करतो. सर्व शक्तिमान सत्यत्वास आजमीवतो. आणि असत्य ज्यास आवडतें त्याचा आत्मा त्याजबरोबर शत्रुत्व ठेवतो. आणि तेणेंकरून दुष्टावर अग्नि आणि गंधकाची वृष्टि करतो. आणि मृत्यु नंतर घोर नरकाचा विभागी होईल; कारण कीं, पूर्णब्रह्म सत्य आहे. सत्यास इच्छितो आणि त्याचें पवित्र मुख कृपेकडेस आहे.

अभंग.

शौच केलें तेणें शुचिर्भूत झाला ॥
जळीं स्नान केला मळ त्यागें ॥ १ ॥
मळ त्यागें झाला शरीरें निर्मळ ॥
अंतरीचा मळ कैसा गेला ॥ २ ॥
कैसा जातो काम, क्रोध, लोभ दंभ॥

नांदतो स्वयंभ अंतर्यामीं ॥ ३ ॥
अंतर्यामीं आधीं होईजे निर्मळ ॥
तेणें तुटे मूळ संसाराचें ॥ ४ ॥
संसाराचें मूळ सुक्ष्मीं गुंतलें ॥
मनही भुललें विभ्रमाशीं ॥ ५ ॥
विभ्रमाशी बरें शोधुनी पाहावें ॥
अंतरीं राहावें निष्ठावंत ॥ ६ ॥
निष्ठावंत ज्ञान पूर्ण समाधान ॥
मग संध्या स्नान सफळची ॥ ७ ॥
सफळची संध्या संदेह नसतां ॥
निःसंदेह होतां समाधान ॥ ८ ॥
समाधान नाहीं स्नान संध्याकाळीं ॥
लोकांचीया मेळीं लोक लाजे ॥ ९ ॥
लोक लाजे सर्व लौकीकची केला ॥
देव दुरावला वरपंगें ॥ १० ॥
वरपंगें देव कदां सांपडेना ॥
निष्ठेचा घडेना भक्तिभाव ॥ ११ ॥
भक्तिभाव देवीं दृढ होय ज्याचा ॥

कर्म लौकिकाचा खटाटोप ॥ १२ ॥
खटाटोप देव कदां पाविजेना ॥
निश्चय घडेना शाश्वताचा ॥ १३ ॥
शाश्वताचा शोध अंतरीं असतां ॥
सर्वही पाहातां निरर्थक ॥ १४ ॥
निरर्थक तिर्थं निरर्थक व्रतें ॥
दास ह्मणें जेथें ज्ञान नाहीं ॥ १५ ॥

पद.

स्मरतां नित्य हरी ॥ मग ते मा-
या काय करी ॥ ध्रु० ॥ श्रवणें
मननें अद्वय भजनें ॥ पळतो
काळ दुरी ॥ मग ते० ॥ १ ॥ क-
रुणाकर वरदायक जो हरी ॥
ठेवी हात शिरीं ॥ मग ते० ॥२॥
मोहोनराय नित्य ब्रह्म चरणीं ॥
अमृतपानकरी ॥ मग ते० ॥ ३ ॥

उपासना उन्नति.

हे मोक्षदात्या परमेश्वरा माझी

उन्नत्ति कर. कारण सत्यमार्गी कमी झाले आहेत. आणि आमानतदार मनु वंशांतून कमी झाले ते सर्व आपले बंधुजना समागमें गैर वर्तणूक करतात. आणि खुशामतीनें, कपटानें बोलतात. पूर्णब्रह्म खुशामतीचे शब्द आणि ती जीभ जेणेंकरून गर्विष्ट शद्ब निघतात त्यास तो कापून टाकील. जे असें ह्मणतात कीं, आह्मी आपले जिव्हेनेंच आमचें कार्य करूं, आमचे शब्दच प्रमाण आहेत. कोण आहे आमचा प्रभु अनाथांची विनंती आणि कामनिकांच्या इच्छेचे स्वासोस्वासावर नजर करून ब्रह्म आज्ञा देतो. मी आतां जागृत होतों. जे त्यांस फसवितात त्यांजपासून मी त्यांस मुक्त करीन. ब्रह्म याची आज्ञा आहे कीं,

मी त्यांचा रक्षक आहें. हे पूर्णब्रह्म तूं त्यांचा रक्षक आहेस. तूं त्यांच्या पिढानपिढीचा रक्षक आहेस. नास्तिक दरएक जागीं आकडत फिरतात. जेव्हांपासून निचास महत्व आलें. नीच तेच कीं, जे ईश्वरास मानीत नाहींत.

पद.

शरण तुला भगवान। प्रणमु पायां पडुरे प्रभु ॥ ध्रु० ॥ वृथा गेला भवजन्म आमचा। नाहीं राखलें निजभान । दास सदां जाणुनी तुझा। तारा भवसागरांतुनी निदान ॥ शर० ॥ १ ॥ सगुण स्वरूपांत गुप्त राहिला । अन्य नाहीं तुज समान। नाहीं जाणलें ऋषिमुनीनें। तुझें निश्चल स्थान। शरण० ॥ २ ॥ किंचित् नाहीं मी

योग्य परंतु । मागतों मी वरदान । करतुम करतुम अन्यथा करतो । मानुनी बळवान । शरण० ॥ ३ ॥ शरणांगताची लज्जा राखा। विश्वाधीश महान । मन वांच्छित फल निश्चय द्या । हे प्रभु कृपानिधान ॥ शरण० ॥ ४ ॥ परमात्मा परब्रह्म प्रभुचें । गाऊ शुभ गुण नाम । भक्तिपूर्वक करूं तुमचें। ज्ञानामृतपान ॥ शरण०॥५॥

अभंग.

जया ज्ञान हें नेणवे ॥ पशु तयाशीं ह्मणावें ॥ १ ॥ कोणे केलें चराचर ॥ कोण विश्वाचा आधार ॥ २ ॥ ब्रह्मादिकाचा निर्मिता ॥ कोण आहे त्या परता ॥ ३ ॥ अनंत ब्रह्मांडाच्या माळा ॥ हे तो भगवंताची लीला ॥ ४ ॥ राम-

दासाचा विवेक ॥ सर्व कर्ता देव एक ॥ ५ ॥

कथा.

श्री रामचंद्र मुलगा दशरथाचा. देशपर्यटन करून दोघे बंधु ह्मणजे श्री राम, श्री लक्ष्मण, हे परत आयुध्येस आले. एके दिवशीं उभय बंधु बसून विचार करते झाले कीं, हें सर्व देश पर्यटन केले. व काशी इत्यादि जागीं दानधर्म केला. परंतु मोक्षसाधन कशानें हें कांहींच समजलें नाहीं. आणि जर मोक्षसाधन न झालें तर हा जन्म व्यर्थ आहे. अशा विचारानें उभयतां बंधूनीं भोजनादिक वर्ज केलें. आणि दिवसानुदिवस उभय बंधु अतिशय कृश झाले. हें वर्तमान पिता दशरथ आणि माता कौशल्या या उभयतांस समज-

तांच महान महान वैद्यांस पाचारण केलें. त्यांस आज्ञा दिली कीं, राम लक्ष्मण यांचे प्रकृतीस पाहून कळवावें. वैद्य जाऊन राम, लक्ष्मण यांची प्रकृति पाहून येऊन राजास विनंती करते झाले. हे राजन् आपले उभय पुत्रांस कोणतेही प्रकारचा रोग नाहीं. असें राजानें ऐकून उभय पुत्रांस पाचारण केलें. ते उभय पुत्र येऊन राजास नमस्कार करिते झाले. राजाने उभय पुत्रांस पाहून अति शोक करिता झाला. कांहीं दिवसांनंतर विश्वामित्र राजसभेस येता झाला. हा विश्वामित्र पूर्वीं क्षत्रिय असून पुढें ब्राह्मज्ञानें करून ब्राह्मण होता झाला. हा विश्वामित्र राजसभेस येऊन राजाप्रत नमस्कार करिता झाला. राजानेंही त्यास नम-

स्कार करून क्षेमकुशल विचारून येण्याचें कारण विचारतां झाला. विश्वामित्र बोलता झाला. हे राजन् असूर माझा छळ करितात. या करितां कृपा करून त्यांचा वध करण्या करितां तुझे पुत्र राम, लक्ष्मण मजला दे. राजा बोलता झाला. हे ब्राह्मोऋषी माझे पुत्र लहान आहेत आणि युद्धविद्या त्यांस माहीत नाहीं आणि थोडे दिवसांपासून त्यांची प्रकृति अतिशय कृष झाली आहे. विश्वामित्र बोलता झाला हे राजन् तूं कांहीं काळजी करूं नको. तुझे पुत्रांस युद्धविद्या मी शिकवीन परंतु राजपुत्र मला दाखवावे. राजानें पुत्रांस पाचारण करविलें. उभय पुत्र राजसभेस आले. वशीष्ठ इत्यादिकांस नमस्कार करून राजसभेस

बसते झाले. विश्वामित्रांनीं उभयता राजपुत्रांस प्रकृति असे होण्याचें कारण विचारलें. उभयतांनीं आपले मनांतील आशय विश्वामित्रास नीवेदन केला. विश्वामित्रानें राजपुत्राचें अशक्त होण्याचें कारण दशरथास नीवेदन. केलें दशरथ फार विचारानें विश्वामित्रांस बोलता झाला हे ब्राह्मोऋषी आपणच ब्राह्मोज्ञान उपदेश करावा. विश्वामित्र बोलता झाला हे राजन् वसिष्टासारखा ब्राह्मोऋषी आणि ब्राह्मोज्ञानी दुसरा कोण आहे, जें आपण मला सांगता. हें ऐकून राजानें वशिष्टास नमस्कार करून उभयता पुत्रांचा हास्त वशिष्टाचे हास्तांत देऊन बोलता झाला हे गुरु आपण कृपा करून उभय पुत्रांस ब्राह्मो उपदेश करावा. वशिष्टानी तथास्तू

ह्मणून उभय पुत्रांस आपले गृहीं घेऊन गेले. आणि ब्राह्मोविद्या शिकाविण्यास आरंभ केला. जो उपदेश श्री वशिष्टांनीं उभय बंधूंस केला तो सर्व जोगवाशिष्टनामक ग्रंथांत आहे. सारांश ब्राह्मोज्ञानावांचून आणि ब्राह्मोधर्मावांचून मोक्षसाधन होत नाहीं. दुसरें, श्री रामचंद्र जर ईश्वर होतें तर ब्राह्मोविद्या उपदेश वशिष्टापासून काय कारणानें घेतला. तिसरें, तीर्थयात्रेनेंच जर मोक्ष होतें तर श्री रामचंद्रासारख्या ज्ञानी पुरुषानें कधींच ब्राह्मो उपदेश घेतला नसता. आतां हें सिद्ध झालें कीं, हिंदूचे कर्म मार्ग अथवा तीर्थाटण या कोणचेही कर्मांत उन्नति साधन नाहीं. उन्नतीस एक ब्राह्मो मार्गच आहे.

अभंग.

माझा भाव तुझे चरणीं ॥ तुझें
रूप माझे नयनीं ॥ १ ॥ सांप-
डलों एकामेका ॥ जन्मोजन्मीं
नोहे सुटका ॥ २ ॥ त्वां तोडिली
माझी माया ॥ मी तो जडलों
तुझ्या पायां ॥ ३ ॥ त्वां मज
मोकलिलें विदेहीं ॥ म्यां तुज
घातलें हृदयीं ॥ ४ ॥ नामा ह्म-
णे बा सुजाणा ॥ सांग त्वां न
ठकविलें कोणा ॥ ५ ॥

अभंग.

देह जावो अथवा राहो ॥ ब्रह्मरं-
गीं माझा भाव ॥ १ ॥ चरण न
सोडीं सर्वथा ॥ आण तुझी वाहे
नारायणा ॥ २ ॥ वदनीं तुझें मंगळ
नाम ॥ हृदयीं आखंडित प्रेम ॥
३ ॥ शहाजी ह्मणे हरीराजा ॥

केला पण चालवी माझा ॥ ४ ॥

पद.

तुजविण अन्य नाहीं प्रभु त्राता । नम्रतेनें तुज विनंती करितों । विश्व तूं विभु धाता ॥ तुज० ॥ १ ॥ सर्व ऋषीमुनि शुक सनकादिक । तुज महिमा गुणगाता ॥ तुज० ॥ २ ॥ दीन दयाळा तुज करूणे विण । कोण करी सुख शांता ॥ तुज० ॥ ३ ॥ आश्रय एक तुमचा धरूं । सुख दुःखाचा प्रभु ज्ञाता ॥ तुज० ॥ ४ ॥ साष्टांगें मीं वंदु विभुला पर- ॥ पद मंगलदाता ॥ तुज० ॥ ५ ॥

आर्ती.

जयदेव जयदेव जय मंगलकारी जय मंगलकारी बहु करुणा विस्तारी (२) प्रभु आहे

उपकारा ॥ जय० ॥ १ ॥ षड-
गुणयुत भगवंत भक्ति सदां
द्यावी (२) करुणा करी सेवका-
वर (२) भय संकट कापि ॥
जय० ॥ २ ॥ शुभ मंगलगुण गा-
य भक्तजन तुझे (२) अविचल
शुभ पद द्यावें (२) विभु वि-
श्वोद्धारा ॥ जय० ॥ ३ ॥ कोटचा-
वधि अपराध प्रभु निशदिन प-
हातां (२) दया करी दिन दोष
(२) चित्तांत नका ठेवा ॥ जय०
॥ ४ ॥ सकल विश्वांत व्यापक
प्रभुसत्ता भासे (२) सुंदर नेम
पाहुनी (२) चित्त नित्य उल्हासे॥
जय० ॥ ५ ॥ प्रेम पुष्पाची माळ
प्रभूचे शुभ चरणें (२) अर्पण करी
दृढश्रद्धेनें (२) प्रभूचे राहू शरणे॥
जय० ॥ ६ ॥ दुराचाराहुनी दुर

प्रभु ठेवा आह्मा ( २ ) दिव्य पिता प्रभु करूं ( २ ) विनंती आह्मी तुह्मा ॥ जय० ॥ ७ ॥ मिळी मंडळी महाराज अभिवदन करा ( २ ) सदां करूनि भक्ति ( २ ) स्मरण हृदयधरा ॥ जय० जय० ॥ ८ ॥

ब्रह्मस्मृति उन्नति निरोपण नाम एकादश अध्याय समाप्त ब्रह्मार्पणमस्तु ॐ ब्रह्म०.

## अध्याय १२.

### उपासना आनंदकारक.

हे प्रभु कितपत आमची आठवण तूं करणार नाहींस केंव्हां केंव्हांही नाहीं. कितपत तूं आपलें पवित्र

मुख आमचेकडे करणार नाहींस, कोठपर्यंत मी रोज रोज दुःखांत आणि काळजींत राहीन. कोठपर्यंत माझा शत्रु मजवर शिरजोर राहील. हे ब्रह्म माझे राजाधीराजा माझे दुःखावर दृष्टि दे. आणि माझें ऐकमाझे नेत्र तेजायमान कर. असें न हो कीं, मला मृत्यूची झोंप येईल. असें न हो कीं, माझा शत्रु ह्मणेल मी यांस जिंकिलें. आणि मला दुःख देणारे माझे शेवटले दिवसापासून आनंद न मानोत. आणि तुझे कृपेवर माझा पूर्ण भरंवसा आहे. माझें मन तुझे उन्नतीपासून आनंदांत आहे. मी ब्रह्मस्तुति गाईन कारण त्यानें मजवर महत उपकार केले आहेत. ॐ शांति शांति शांति.

उपासना ६ अध्याय १२.

अभंग.

ज्ञानाविणें जे जे कळा ॥ ते ते जाणावी अवकळा ॥ १ ॥ ऐसें भगवंत बोलिला ॥ चित्त द्यावें त्याच्या बोला ॥ २ ॥ एके ज्ञानें-चि सार्थक ॥ सर्व कर्म निरर्थक ॥ ३ ॥ दास ह्मणें ज्ञानाविण ॥ प्राणी जन्मला पाषाण ॥ ४ ॥

अभंग.

धातु पाषाण मृत्तिका । चित्र लेख काष्टें देखा । तेथें कैचा देव मूर्खा । दास ह्मणें भ्रांती पडली ॥ १ ॥

पद.

जैसें ज्यानें केलें ॥ तैसें त्याला फळ झालें ॥ ऐसें अनुभवाशीं आलें ॥ यांत आमुचें काय गेलें ॥ ध्रु० ॥ जारचोर चहाडखोर ॥ निंदा द्वेषी रांडापोर ॥ त्याशीं यम-

दुतांनीं बांधुनि अघोर नरकीं नेलें ॥ यांत ० ॥ १ ॥ काळव्याळ हा विक्राळ ॥ ब्राम्हु पाहे सर्वहि काळ ॥ त्याचें वय सांडुनिया मूर्खें स्वहित टोलाविलें ॥ यांत० ॥ २ ॥ भक्तविरक्त योगीसंत ॥ ब्रह्मज्ञानीं जीवनमुक्त ॥ त्याची सेवा- करितां ब्रह्म वैकुंठासी नेलें ॥ यांत ॥ ३ ॥

उपासना उन्नति.

मूर्ख आपले मनांत ह्मणतो ईश्वर नाहीं. ते दुष्ट आहेत. तेच आपलें कर्मे करून दोषी झाले. कोणी एकहि निर्दोशी नाहींत. जगदीश्वरानें ब्रह्म लोकांतून ऐकलें. आणि मनूचे वंशजांवर दृष्टी केली. त्यांत पाहिलें कीं, कोणी ज्ञानी आहे किंवा ब्रह्म याची ईच्छा करणार आहे. तर त्यांतून कोणी

हेत. आणि तेच सर्व दुष्ट झाले. एक निर्दोषी नाहीं. एकहि नाहीं काय ! त्या सर्व दुष्टांस ज्ञान नाहीं. जे माझे दासास केवळ पोळी सारखे चावतात. आणि ब्रह्मनाम स्मरण करीत नाहींत तेच तेथें अतिशय भितीत पडले. कारण ईश्वर नित्य सत्याचे साह्यास असतो. तुह्मी ब्रह्मदास जे अनाथ आहेत त्यांशीं भाषण करण्यास लाजता. कारण ईश्वर त्यांचा आश्रय आहे. पूर्णब्रह्म याचे चरणाजवळ आशा आहे. पूर्णब्रह्म करो कीं, ब्राह्मोची उन्नति पवित्र सभेंतून होवो. ज्या समयीं कृपाळू पिता आपले कैदी लोकांचा मेळ परत आणील, त्या समयीं मुनी आणि पयंबर आनंद मानतील. आणि ब्राह्मो

उपासना ६ अध्याय १२.

## प्रभूचा जयजयकार करतील.

ललित छंद.

सकळ विश्वाचे नाथ तुह्मी। शरण येऊन वंदितों आह्मी ॥ अल्प जीव किती करो स्तुति। गहन तुझी आहे रे प्रभु गति ॥ १ ॥ नेम जे प्रभु तुह्मी केले आहे। तदनुसार सर्व क्रिया होत आहे॥ एकरतीही यांतून फिरेनाहि। गहन तुझी आहे रे प्रभु गति ॥ २ ॥ जीव कितीही यत्न करो। तथापि नेम तुझा न फिरो ॥ चमत्कारिक तुझी प्रभु मति। गहन तुझी आहे रे प्रभु गति ॥ ३ ॥ नमिनमी तुज प्रभु आह्मी। विनविये सदा मातताात आह्मी ॥ प्रभु तुझी कळा कधीं न कळे। गहन तुझी आहे रे प्रभु गति ॥

४ ॥ क्षणमात्रांत काय आहे । आह्मी जीव जाणत नाहीं ॥ अति तुझा चमत्कार आहे । गहन तुझी आहे रे प्रभु गति ॥ ५ ॥ प्रभु मनोरथ केले बहु । नाहीं पूर्ण होत तवकृपेविना ॥ अनुग्रहानें प्रीति करा । गहन तुझी आहे रे प्रभु गतिं ॥ ६ ॥

अभंग.

अन्न देणार श्री हरी ॥ तोचि प्रतिपाळ करी ॥ १ ॥ ज्या देवाचे आज्ञे वरी ॥ मेघ वर्षती अंबरीं ॥ २ ॥ तयाशीं चुकलीं बापुडीं ॥ अन्न अन्न करिती वेडीं ॥ ३ ॥ रामदास ह्मणे ऐक ॥ आदि अंतिं देव एक ॥ ४ ॥

अभंग.

नलगे तीर्थाटन । जाणें वनातंरा ।

सुखें येतो घरा नारायण। ठाईच
बैसूनी करा एक चित्त। तुका ह्मणें
आवडी आनंत आळवावा ॥ १ ॥

पद.

रत हरी पदकमल कंद सेवी मनो
भ्रमरा ॥ ध्रु० ॥ दुष्ट दैत्य दमुनी
देतनिज-भक्तथारा ॥ भक्ति मनीं
धरूनिभावसांडि भव-पसारा ॥
रत०॥ १ ॥ शुक सनकादिक मुनी
जपती ज्या अधारा ॥ सुरवर मु-
नि गाती मुखें नित्य निराकारा ॥
रत० ॥ २ ॥ पावनपद रजेकरूनि
भक्तनरा ॥ निशिदिनी आनंद तन-
यगाय वेदसारा ॥ रत० ॥ ३ ॥

उपदेशपर उपासना.

हे पूर्ण ब्रह्म तुझे पवित्र स्थानीं
कोण राहील. तुझ्या ब्रह्मलोकांत कोण
वास करील. ते जे सत्य चालतात

आणि ब्रह्ममार्गांत चालतात, आपले मनापासून सत्य वर्तणुक करतात, जे आपले जीव्हेनें कुचिष्ठा करीत नाहींत, जे आपले शेजाऱ्यांस दुःख देत नाहींत, जे उत्तम पुरुषांची सोबत करितात. जे पापास भितात, तसेंच न्यायकारी प्रभु याची भिती बाळगणारांस नमस्कार करितात. ते जे आपले नुकसाना करितां प्रतिज्ञा करून तें कर्म पुन्हा करीत नाहींत, जे व्याजाचे आशेनें कर्ज देत नाहींत, जे असत्य कर्मांत लाच घेत नाहींत असें कर्म करणारावर पूर्ण ब्रह्म क्रोधायमान होणार नाहीं.

पद.

तुजविण अन्य नाहीं प्रभु त्राता
॥ ध्रु० ॥ नम्रतेनें मी तुज विनंती
करू । विश्व तूं विभु धाता ॥ तुज

०॥ १ ॥ ॥ सर्व ऋषी मुनि शुक
सनकादिक । तुझी महिमा गुण-
गाता ॥ तुज० ॥ २ ॥ दीन दया-
ळा तुज करुणेविना । कोण करी
सुख शांता ॥ तुज० ॥ ३ ॥ आ-
श्रय एक तुमचा धरूं । सुख दुः-
खाचा प्रभु ज्ञाता ॥ तुज० ॥ ४ ॥
साष्टांगें आह्मी वंदु विभुनें । पवि-
त्र पदल दाता ॥ तुज० ॥ ५ ॥

कथा.

श्री कृष्ण हे पूर्ण ब्रह्मज्ञानी होते यांत कोणचेही प्रकारचा संदेह नव्हता. कारण गीतेंत श्री कृष्ण यानीं आर्जुनास उपदेश केला. त्यांत स्पष्ट सांगितलें आहे कीं, ब्रह्म ज्ञानावांचून कोणास मोक्ष होत नाहीं. तसेंच श्री कृष्ण सांगतात हे आर्जूना जें कर्म तूं करशील तें एक ब्रह्म-

प्रित्यर्थ कर. तसेंच श्री कृष्ण सांगतात कीं, सर्व धर्म त्याग करून ईश्वराचें तेज असा जो आत्मा यास शरण जा. असेंच श्री कृष्ण उद्धवास सांगतात हे उद्धवा तूं जसा माझी पुजा करतोस तसेच माझे जे भक्त त्यांची पूजा मी करितों. सारांश आत्म्यास आत्मा प्रीति करतो.

कथा.

सुधन्वा हा ब्राह्मो असून त्याचा पिता हिंदुमुर्ती पूजक असे. या समयीं अश्वमेघ यज्ञाचे संबंधानें युद्धप्रसंग होता. त्यांत सुधन्वा याच्या पित्यानें आपल्या नगरींत आज्ञा दिली होती कीं, प्रातःकाळीं सूर्योदयापूर्वीं रणभुमींत सर्वत्रांनीं हजर असावें जो हजर न होईल त्यास उष्ण तेलाचे पात्रांत टाकलें जाईल. राजाज्ञेप्रमाणें

नगरजन रणभुमीचे ठायीं सिद्ध होते फक्त सुधन्वा राजपुत्र मात्र नव्हता कारण त्याचे नेमाप्रमाणें ब्राह्मोकर्म आणि ब्राह्मोपासना होण्यास सुचीरभूत कारणानें कांहीं वेळ लागला. येणेंकरून राजाज्ञा भंग केल्याचा दोष पित्यानें पुत्रावर ठेवला. व सेवकास तैलपात्र उष्ण होत होतें त्यांत पुत्रास सर्वांसमक्ष टाकण्याची आज्ञा दिली. पुत्रानें ईश्वर उपासना करून उष्ण तेलांत उडी घातली. ब्रह्म सत्तेनें तें तैल बर्फाप्रमाणें सीतळ होऊन पुत्रास कांहीं झालें नाहीं. हें त्या दुष्ट मुर्तीपूजक पित्यानें पाहून तो आचार्यांस विचारता झाला. तो ब्राह्मण नास्तिक, मुर्तीपूजक, ईश्वरापासून फिरलेला असा दुष्ट होता. त्यास राजा ह्मणता झाला हे आचार्य असें होण्याचें

कारण काय. तो दुष्ट ब्राह्मण ब्रह्मज्ञानी नसल्याकारणानें राजास बोलता झाला, हे राजन् तैल सीतळ असेल या कारणानें सुधन्व्यास कांहीं झालें नाहीं. यावरून राजानें नारळ दुष्ट ब्राह्मणाचे हातांत दिला. त्यानें तो नारळ तेलांत टाकतांच एक शकल उडून त्या नास्तिक ब्राह्मणाचे मस्तकांत लागलें. दुसरें शकल नास्तिक राजाचे मस्तकांत लागलें. उभयतांस इजा झाली. तेणेंकरून या बिचाऱ्या सुधन्व्याची पाठ सुटली. सारांश या कथेवरून स्पष्ट सिद्ध होतें कीं, कसेंही संकट ब्रह्मदासावर येवो तो स्वतः पूर्णब्रह्म आपले शक्तीकरून भक्ताचें दुःख हरण करतो. याच कथेवरून सिद्ध होतें कीं, मुर्तीमध्यें कोणचेही प्रकारचें सामर्थ्य ना-

हीं. प्रश्न ॥ हें तुह्मी अगदीं लबाड बोलता. आह्मी उदाहरण देतों ऐका. मुर्तीत महत सामर्थ्य आहे. कसें वाघजाई वाघाचे तोंडांतून सोडविती. सटवाई मुलांस रोगांतून वांचविती. काळी महामारींतून वांचविती. फोड-जाई मातेंतून बरी करती. ह्मसोबा पिशाच्यबाधेंतून वाचवितो. मारुतीचे शनवार आणि भीमरुपीचा पाठ केला असतां सर्व दुःख नाश होतें. वहावा. झालें तुमचें उदाहरण. हें सर्वस्वी तुह्मी लबाड बोलतां. जर असें असतें तर तुकाराम असें न ह्मणता दुसरें जर मुर्तींत सामर्थ्य असतें तर उभयतांस शकलें न लागतीं. यावरून सिद्ध झालें कीं, मुर्तीत कांहींच सामर्थ्य नाहीं.

उपासना ६ अध्याय १२.

अभंग.

कासया पाषाण पुजीति । पितळा अष्ट धातु खळ । तुका ह्मणें देव एक । भावहीण तो व्यर्थ ॥ १ ॥

अर्ती.

जयदेव जयदेव जयभगवन्न देवा जयभगवन्न देवा । भक्तीपूर्वक तुमची (२) करूं निशीदिन सेवा ॥ जयदेव० ॥ १ ॥ प्रभुचा पार-अपार ऋषी मुनि नव पावले (२) स्तुति गुण गाइन तुमची (२) मनाला विश्राम द्या ॥ जय-देव० ॥ २ ॥ सर्व स्थळीं प्रभुचा वास सत्य करीं जाणूं (२) हें अ-ति उत्तम विधीनें (२) अवाहन मानूं ॥ जयदेव० ॥ ३ ॥ प्रेमपात्र परीपूर्ण भरूं श्रद्धापाणी (२) पाद्य अर्घ्य आर्चन विधी (२)

करुनी रमल मनीं ॥ जयदेव० ॥ ४ ॥ परमेश्वर प्रणिधान धरा नित्य मनांत (२) गंध पुष्प भक्तीनें ( २ ) अर्पूं प्रभु पदांत ॥ जयदेव० ॥ ५ ॥ मंगळमय महाराज मंगळपद द्यावें ( २ ) कृपा करुनी मुजशिरें (२) हस्तवरद-स्थापावें ॥ जयदेव० ॥ ६ ॥ परमात्म्याचें ध्यान हृदयांत धरूं (२) अति उपकार तुमचा (२) कधीं न विसरूं ॥ जय०॥ ७॥ दर्शन द्या महाराज दीनवत्सल दाता(२) नम्रतेनें विनंती करूं ( २ ) विश्व पितामाता ॥ जयदेव० ॥ ८ ॥

ब्रह्मस्मृति ब्रह्मशक्ति निरोपण नाम द्वादश अध्याय समाप्त ब्रह्मार्पणमस्तु ॐ ब्रह्म०.

# अध्याय १३.

ॐतत्सत ब्रह्मणेनमः

या अध्यायांत नित्य उपासना-विधी प्रथम सांगतों. नित्य उपासनेस पांच अंगें आहेत तीं ध्यान, स्तुति-धन्यवाद, धर्मपुस्तकाचा पाठ, पाप-क्षमा, अशीं पांच अंगें. त्यांतून ध्या, न व आरंभाची उपासना उपासना १ पहिली असें लिहिलें तीच उपा-सना कथेपर्यंत करावी. कथा वाचूं नये. हा प्रकार प्राथःकाळ, सायं-काळ, शयनकाळ, तिन्ही समयाचा जाणावा. तसेंच धन्यवाद, पापक्षमा, हीं अंगें तिन्ही उपासनांत एकसार-खींच आहेत. याकरितां दरएक उपा-सनेंत हीं अंगें एक जागीं लिहिलीं आहेत. तसेंच धर्मपुस्तकाचा पाठ

करावा असें लिहिलें दरएक उपासनेंत तर या पुस्तकांतून कोणचेही एका अध्यायाचा पाठ करावा. अथवा उपनिषध, गीता, सत्यसागर, यांतून ज्यांस जें वाटेल त्याचा पाठ करावा. त्रिकाळ समयाची ईश्वर स्तुति मात्र निराळी आहे ती निरनिराळी लिहिली आहे. पदें व अर्ती या अध्यायीं आहे तींच तिन्ही उपासनेंत उपयोगी आहेत.

उपासना पापनाशनार्थ.

हे परमात्मन् या संसारांतील नानाप्रलोभनांत तुच माझा एक आश्रय स्थान आहेस. तुझ्यांतच माझी सर्व आशा आहे. पाप तापानें तापीत होऊन आणि कोठें जाऊन आपले संतप्त प्राणास शांत करूं. मी तुझाच आहें. हे प्रभु सदा मी तुझाच

आहें. तुझ्या समोर मी रुदन करतों. पापापासून माझे संतप्त आत्म्यास विमुक्त कर. तुज जवळ जे माझे कित्येक अपराध आहेत, त्यांचा अंत नाहीं. तुझा पुत्र होऊन, तुझा अज्ञाकित दास होऊन तुझे आज्ञेस मी अमान्य केलें आहे. तुझे प्रितीनें सर्वदां पालनपोषण होतें. तथापि तुजला मी विसरून जातों. तूं पापमार्गांतून परित्याग करण्याकरितां मला सर्वदां आदेश करीत होतास. आपल्या मंगलकारक मार्गांत सदा अवाहान करीत होतास. तथापि तुझे आदेश ऐकून मी पालन ते केले नाहींत. माझ्यावर तुझा अतिप्रेम आहे. परंतु तुझ्यांत माझी प्रिती नाहीं. संसारांत ही माझी सारी प्रिती आहे. माझे अपराध इतके आहेत कीं, तुझे सन्मुख

जाण्यास मला संकोच वाटतो. हे मंगलदात्या, मुक्तिदात्या. परमेश्वरा माझें परित्राण कर. अनुतापित हृदय आणि व्याकूळ चित्तानें क्षमाप्रार्थना करतों माझें पाप भस्मी भुत कर. नीच चिंता, मलिन कामना माझे चित्तांत न राहोत. अंधःकार संसारांतून आकर्षण करून माझे चित्तास आपल्याकडे घेऊन जा. जें कांहीं कर्म, जे कांहीं धर्म, ज्या कांहीं कामना तुजपासून मला विच्छिन्न करतील त्यांस माझे हृदयांतून उन्मुलन कर. आपले सर्व कर्मांत तुजवर एकांत भावानें विश्वास ठेवूं कारण तूंच माझें सर्वस्व धन आहेस. ॐ तथास्तु.

धन्यवाद.

हे जगतपित्या तुझे उपकार कोणते शब्दानें वर्णन करूं. कारण मात्र

पन वाचून एवढी मोठी झाली. तुझे-
च सत्तेनें आणि तुच जेव्हां मला
कांहीं शक्ती नव्हती त्या समयीं मा-
तुश्रीचे दुधानें माझें रक्षण केलेस.
त्यानंतर आजपावेतों अन्न देऊन
रक्षण केलेंस. तसेंच रात्रौ हांतरूण,
पांघरूण, रहाण्यास घर, तुझे कृपेनें
आह्मास मिळत आहे. तसेंच या ज-
गांत वेळोवेळीं सुख आणि अरोग्य-
ता आणि पाळीग्रहण तुंच करितोस
हे पित्या आमचा सर्व आधार तुंच
आहेस. जर तुझा आश्रय आणि
तुझी कृपा नसेल तर एक क्षणही या
जगांत आणि या संसारांत रहाणें
होणार नाहीं. आणि एक क्षण आ-
ह्मी जीवंत रहाणार नाहीं. हें सुखका-
रक आजपावेतों जें जें सुख आह्मास

झालें व यापुढें जें होईल व हल्लीं जें होत आहे हें सर्व तुंच देत आहेस. तुजविना दुसरा कोणी देणारा नाहीं. आमचा सहायकर्ता तुंच आहेस. जसें आह्मास पाळणार आहेस, तसेंच आह्मास सत्यत्वांत घेऊन जा. मला सुमती दे कीं, सत्यशास्त्राप्रमाणें वर्तन करून सग्दुणी होईन. आमचे बुद्धीस भ्रमवीणार आणि असत्य मार्गांत घेऊन जाणारे संसारांत पुष्कळ मोहोजाळ आहेत. त्या सर्वांचे परीक्षेचें ज्ञान द्यावें. आणि तसे मार्गांत न जाण्यास आणि तुझा सेवक होण्यास मला योग्य कर. आणि कोणते कर्मै करून पाप होतें आणि कोणते कर्मै करून पुण्य होतें याचें ज्ञान मला दे. आणि असत्यांतून मला सत्यांत घेऊन जा. हे

उपासना ७ अध्याय १३.

देवाधिपती हे कल्याणकारी महा प्रभु तूं प्रसन्न हो असें मी वर्तन करूं. हीच आमची इच्छा व हीच आमची मनकामना. हे दयाळू महा पित्या आमची दिनवाणी ऐक, आमचा दंडवत अंगीकारकरून आमची प्रार्थना सफळ कर. ॐ शांती शांती शांती.

उपासना प्राथःकाळ.

हे करुणामयापित्या तुं अति असहाय रजनीचे अवस्थेंतून सुटका माझी केली त्या निमित्य मी तुजला प्राथःकाळची पुजा आणि स्तुतिउपहार अर्पण करतों मी तुझे महत उपकार मानितों कीं, तुझेच कृपेनें नूतन व्यापार आणि शक्तीनें नवे दिवसाचे कार्यांत, तुझेच कृपेनें प्रवृत्त होतों. सर्व वस्तूंचें तूंच पाळण करितोस

आणि त्या तुझे कृपेचा प्रचार करि-
तात. या दिवसाचे कार्यांत आणि
सुखांत प्रवृत्त होण्याचे आरंभीं मी
तुलाच शरणांगत येऊन आपले श-
रीराचें आणि मनाचें सर्व बळ तुझे
कार्यांत खर्च करण्यास इच्छितों. जे
सर्व लोभी माझे परीक्षेकरितां परी-
क्षा करतात यांनां असत्य कर
ण्यास सामर्थ्य मला दे. तुझा उप-
देश माझे चिताचे नेमीत आहेत.
तुझा प्रेम माझे मनाला आर्द्र करो.
आणि तुझें पवित्र तेज माझ्या मा-
र्गाचें प्रकाशक होऊन मजबरोबर
राहो. हे करुणा निधान माझे अप-
वित्र कामनेस दूर कर. विषय लालु-
च निवृत्त कर. आणि माझे हेतु
आणि भाव आपलेकडेस घेऊन जा-
ऊन पवित्र कर. माझे सारे कर्तव्य

साधनांत उत्साही आणि आपला अनुगत कर. आणि संसाराचे सारे कामांत माझे अंतःकरणास शुद्ध ठेव. आणि अशी दया कर कीं, माझा लोभ माझे विश्वासाला तुजपासून कधीं दूर न करो. आणि मी जों पावेतों जींवंत आहें तों पावेतों तुजशीं दृढ, अबद्ध राहीन. मला असें स्मरण करण्यास शिकीव कीं, तुजलाच प्राप्त होणें एक माझें कर्तव्य आहे. या कर्तव्याकरतां आजचा दिवस आणि सर्व दिवस यापन करूं अशी सहायता कर. हे आविनाशी पित्या, हे चिरसुहृद मला असें सामर्थ्य दे कीं, पवित्रतेंत आणि विश्वासांत सर्वदां राहीन. ज्यांत प्रति दिवशीं मी तुझा निकट वर्ती होईन.

अभंग.

खरें बोले तरी ॥ फुकासाठीं जो-
डे हरी ॥ १ ॥ ऐसे फुकाचे उपा-
य ॥ सांडुनिया वाया जाय ॥ २ ॥
पर उपकार ॥ एका वचनाचा
फार ॥ ३ ॥ तुका ह्मणें मळ ॥
मनें सांडीतां शितळ ॥ ४ ॥

पद.

जय जय जगदीशा सृष्टीकर्ता
कृपाळा ॥ त्रिभुवन प्रतिपाळा
प्राण दाता दयाळा ॥ तुजप्रद
प्रणमी जोडुनि दोहों हस्त ॥
विदित विभुला आमचें सर्व कृ-
त्य ॥ १ ॥ अल्पमती आमची हें
मागणें सर्व केलें ॥ करावें उचि-
त प्रभु लक्षांत घेई ॥ घटीत जें
आहे तें स्वीकारूनि घेई ॥ प्रण-

तजन जीवांस पूर्ण आषीश देई ॥ २ ॥

अभंग.

नेणें गाणें कंठ नाहीं हा सुस्वर ॥ घालूं तुजवर भार प्रभुराया ॥ १ ॥ नेणें काळवेळ राग घातमात ॥ तुझे पायीं चित्त ठेवी देवा ॥ २ ॥ तुका ह्मणें मज चाड नाहीं जना ॥ तुज नारायणावांचूनिया ॥ ३ ॥

पद.

कृपाळू जगन्नाथ जीवाचे प्रतिपाळक ॥ शरण राखावें स्वामी जाणोनी दिनबाळक ॥ कृपाळू० ॥ १ ॥ इच्छा आशा आमची जी केली ती आह्मी विदित ॥ काय त्यांत आहे योग्य ॥ तें आह्मी जाणिलें नाहीं ॥ कृपाळू ॥ २ ॥

मनोरथ जे आहेत सर्व । ते प्रभु सर्व पुरवावे । कृपा दृष्टी करूनि नाथ । किलबिश सर्व कापावें ॥ कृपाळू० ॥ ३ ॥ सत्य आधार । आहे नाथ । आह्मा द्यावा खरा सुत वात्सल्य भावार्थी । कृपा सिंद्धो कृपा करा ॥ कृपाळू० ॥ ४ ॥

उपासना सायंकाळ.

आज सर्व दिवस तुझेच साह्यतेनें मला सुखांत आणि अरोग्यतेंत गेला. आज जीं कांहीं विघ्नें आणि संकटें मजवर येणार होतीं त्यांतून तूंच माझें रक्षण करून मला असें सामर्थ्य दिलेंस कीं, उपासनेस योग्य केलेंस. याजकरितां सायंकाळचे शुभवेळेस तुझी पुजा आणि स्तुति करितों. हे जगपाळक आज जे संसारांत जीं जीं कार्यें मी केलीं त्यांत

तुझे प्रसन्नतेचीं किती कार्यें मजकडून झालीं हें मी जाणत नाहीं. कारण मी अज्ञान आहें. परंतु सर्व कर्मांचा जाणता आणि साक्षी तूं आहेस. या संसारांत आज जीं जीं कार्यें तुझे आज्ञेविरुद्ध मजकडून झालीं असतील तीं सर्व तूं जाणत आहेस. हे पूर्णब्रह्म मी तुला शरणांगत येऊन विनंती करितों कीं, तुझे आज्ञेविरुद्ध मी आपले हिताकरितां जीं जीं कर्में केलीं असतील त्या सर्वांची क्षमा कर. कारण तुजवांचून अन्य कोण सामर्थ्यवान आहे. जो क्षमा करील कीं याकरतां यासमयीं तुझे द्वारीं येऊन वरदान मागत आहें, तूं कृपा करून वरदान दे. आणि वरदान देण्यास तुजवांचून दुसरा कोणीही योग्य नाहीं. हे देवाधिदेवा आतां या सायं-

काळचे उत्तम समयांत मी तुझे सेवेंत निमग्न होऊन त्यांतच निद्रिस्थ होईन असें कर. कारण तुझें नांमापेक्षां या जगांत कांहींच गोड नाहीं. इतकेंच नाहीं तर तुझे नामस्मरणांत माझा प्राणही जावो तथापि तुझे नामाचें विस्मर्ण न घडो. हेंच वारंवार तुजजवळ मागणें आहे. तुला अनन्य भावें शरण येऊन वंदन करतों. हे प्रभु तूं माझे विनंतीचा स्वीकार कर. ॐ शांती शांती शांती.

पद.

जगदीश आहे अनुप । करुणामय स्वरूप । श्रवण करा आमची।
विनंती कृपा करुनी ॥ जगदीश० ॥ १ ॥ सात्विक गुण प्रधान ।
धरूं तो दया निधान । भक्तावर आहे तुमची । दृष्टी ती दयेची ॥

जगदीश० ॥ २ ॥ भासे जें सर्व विराट। प्रभु आहे तुमचा थाट। सर्व हे सत्य घाट। आहे सत्ता तुमची ॥ जगदीश० ॥ ३ ॥ तूं आहेस प्रभु वरिष्ट। सत्ता आहे अति बलिष्ट। आमचें सर्व अरिष्ट। कृपेनें सऱ्हारी हरि ॥ जगदीश० ॥ ४ ॥

अभंग.

ब्रह्मतारी ब्रह्ममारी ॥ ब्रह्म सर्व कांहीं करी ॥ १ ॥ अन्नोदक हरी केलें ॥ सर्व त्यानेंचि निर्मिलें ॥ २ ॥ तयाशीं चुकलीं बापुडीं ॥ अन्न अन्न करिती वेडीं ॥ ३ ॥ रामदास ह्मणें एक ॥ ब्रह्म त्रैलोक्य नायक ॥ ४ ॥

पद.

दाखवी दिव्यपाय हृदयाभिरा-

मा ॥ध्रु०॥ हीन दीन आस तुझी,
कास पूर्ण आह्मा ॥ धरावया प-
हातसें अगहृदयाभिरामा ॥ दा-
खवी०॥ १॥ मायबाप बंधु गोत्र,
मित्र तुंचि आह्मा ॥ तुजविण
कोण असे सांग हृदयाभिरामा ॥
दाखवी० ॥ २ ॥ सखया आनं-
द तनय ह्मणें अगा गुणग्रामा ॥
शिण भागवी त्वरें पुसूनिया घा-
मा ॥ दाखवी० ॥ ३ ॥

शयन समयाची उपासना.

हे परमेश्वरा आज तूं मजवर नाना प्रकारची करुणा वर्षण केली आहेस त्या करतां मी तुला वारंवार नमस्कार करतों. सर्वज्ञ परमेश्वरा आज जें जें पाप मी केलें आहे, आणि तुझे इच्छेचा अनुयायी होण्यास जितकी माझी सुस्ती झाली

आहे ती सर्व तूं जाणतोस. अंतःकरणापासून अनुताप करून तुझी कृपा प्रार्थना करतों. माझे आत्म्यास पवित्र कर आणि अशी दृढता मला दे कीं, मी पुन्हा अशा प्रकारचे पापांत पतित होऊं नये. तुझे प्रसादावांचून प्रलोभन अतिक्रम करण्यास माझें कांहींच सामर्थ्य नाहीं याकरतां मी विनंती करतों कीं, हे दयामय मला पूर्ण विश्वास आणि बळ देऊन दुष्ट कर्मांतून निवृत्त कर. माझे आयुष्याचा प्रत्येक दिवस तुझे इच्छेनुसार प्रतीत होवो. आतां हे ब्रह्म असें कर कीं, मी पूर्ण विश्वास हृदयानें शयन करीन. आणि असें विधान कर कीं, जीवित राहून या निद्रेंतून जेव्हां मी जागृत होईन तेव्हां नवीन उद्योगांत व तुझे प्रिय कार्यांत प्रवृत्त

होईन परंतु या रात्रीसच या पृथ्वींत माझी शेष रात्री असेल आणि परलोकांत माझें जागृत होणें असेल तर तुझे प्रसादानें तुझ्या पवित्र स्वरूपाचें दर्शन मला प्राप्त होवो. ॐ तथास्तु.

पद.

सखया हरी विश्रांती तुझिये नामीं ॥ ह्मणुनि मजला ने त्वरें निज सुखधामीं ॥ सखया० ॥ ध्रु ॥ अवचट सुकृतें नरदेहा झाली भेटी ॥ पशु सुत जाया धन धामीं प्रिती मोठी ॥ माझीं माझीं ह्मणुनि म्या धरिलीं पोटीं ॥ यांच्या संगें भोगिल्या दुःख कोटी ॥ सखया० ॥ १ ॥ सोडुनि स्वहिता धांवलों दिशा दाही ॥ शववत झालों मागुता कौतुक पाही ॥

परी खळ जन हे नेदिती कवडी
तेही ॥ परी हे अशा पापिणी
लाजत नाहीं ॥ सखया० ॥ २ ॥
जंववरी दृढता तंववरी या तनुची
प्रिति ॥ जरजर झाल्या निंदक हे
अवघे होती ॥ यांचीं दुःखें तुज-
ला मी सांगू किती ॥ ह्मणुनि ये-
तों हरी तुज काकुलती. ॥ स-
खया० ॥ ३ ॥

## अभंग.

येरे माझ्या प्रभु ॥ मनमोहन हृ-
दयाभिरामा ॥१॥ संतामिसें भेटी॥
देई, देई, कृपा गोष्टी ॥ २ ॥
आमची चुकवी जन्मव्याधी ॥
आह्मा देई हो समाधी ॥ ३ ॥
जनी ह्मणें कैवल्यदानी ॥ करी
ऐशी हो करणी ॥ ४ ॥

उपासना ७ अध्याय १.३.

दरएक उपासनेचे शेवटील उपासना.

हे ईश्वरा तूं आपले कृपेनें आमचे बंधूजनांस आणि आमचे मित्रांस अशी साह्यता कर कीं, तुझे सत्य स्वरूपाचें ज्ञान होवो. आणि हे पूर्णब्रह्म आह्मास नित्य तुझे उपासनेचा वारंवार आनंदाचा प्रसंग आणीत जा. हे सर्व शक्तिमान तुझे सत्तेनें जसा सूर्यप्रकाश केलास तद्वत ह्या तुझे सत्य धर्माचा प्रकाश कर. हे सर्व शक्तिमान तुझे शक्तीनें जसा असुराचा नाश केलास, तद्वत अन्यवस्तूस ईश्वर मानणारे अथवा त्यावर भरंवसा ठेवणारे यांचा नाश कर. आतां तुला अनन्यभावें शरण येऊन नमस्कार करितों. आणि विनंती करितों हे प्रभु तुझे नामाचा या जगांत जयजयकार होवो. हे परमेश्वरा हा-

त जोडून शेवटचें इतकेंच विनंती-
पूर्वक मागतों कीं, हे प्रभु या लोकांत
तूं जें मजकरितां निर्दीष्ट केलें आहे तें
तुझे आपले शत्रूंस दे. परलोकाचें जें
कांहीं आहे तें तुझ्या बंधूस दे. मला
आणखी कांहीं इच्छा नाहीं. हे पूर्णब्रह्म
अगर नरकाचे भयानें मी तुझी पूजा
करीत आहें तर मला नरकानळांत
दग्ध कर. अगर स्वर्गाचे लोभानें
तुझी सेवा करीत आहें तें तर मला
तुच्छ कर. फक्त केवळ तुझ्या निमी-
त्य तुझी अर्चना करीत आहें तर
आपलें सौंदर्य उज्वल रूपाचें मला
दर्शन देण्यापासून निराश नको
करूंस. ॐ ब्रह्म तथास्तु.

धांवा.

जगदीशा केले अनंत उपकार ॥
ह्मणुनी ब्राह्म झाले जगांत ॥ ध्रु० ॥

उपासना ७ अध्याय १३.

जयजयकारें तुझे रे गुण गाऊं ॥
जयघोषें तुझ्या नामातें उच्चारूं ॥
करुणेनें तुझ्या विघ्नें तीं सव्हारूं ॥
त्रिभुवननाथा भव भयातें वारूं ॥
१ ॥ धाडीशी दुःखें खळांच्या शासना ॥ न्यावया त्यांना सौख्याच्या आसना ॥ धांवशी देवा भक्तांच्या पालना ॥ ऐके तरी ही दिनाची प्रार्थना ॥ २ ॥ न येवो ऐसें आझाला संकट ॥ दुःखाचा पंथ देवा हा बिकट ॥ संसार मार्गी क्रमूं देत्या नीट ॥ भक्तीचा तुझ्या कदां नसो वीट ॥ ३ ॥

दिंड्या.

जगामाजी प्रभु कीर्ति तुझी गाजे ॥
दयाघन हें तुज नाम पूर्ण साजे ॥
भक्ति तुझिया अंतरीं विराजे ॥
तुझा डंका या मुखीं नित्य वाजे ॥

उपासना ७ अध्याय ११.

१ ॥ कष्ट होतां बहु दासाला ॥ जगन्नयनीं बहु अश्रुपात झाला ॥ अखील भूमंडळीं कहर महा आला ॥ विश्व मारी प्रभु दिन हाक तुला ॥ २ ॥ हाक ऐकोनि विभो धांवलाशी ॥ ब्रह्मदासा त्वां धरियलें उराशीं ॥ धरुनि त्वां दया दीधलें आह्माशीं ॥ असा देवा तूं पूर्ण कृपाराशी ॥ ३ ॥ ह्मणुनि करितों मंगल नामगान ॥ सकल सौख्याचें एक तूं निधान ॥ तूंच आह्मातें प्रभो पंचप्राण ॥ तुझ्या प्रितीचें होई कधीं न मान ॥ ४ ॥

यानंतर या पुस्तकांतून एक आर्ती ह्मणून उपासना समाप्त करावी.

भोजनाची उपासना.

हे ईश्वरा माझें कल्याण कर. हे दयाळू पित्या आमचें शरीर पोषणा-

र्थ ही जी खायाची सामुग्री तूं आ-
ह्मास स्नेहानें दिली याजकरितां कृत-
ज्ञ मनानें आह्मी तुला नमस्कार क-
रितों. हे ईश्वरा जें तूं आह्मास हें भो-
जन दिलें यांत आह्मी सत्वगुणी रजो-
गुणी तमोगुणी कांहींच समजत ना-
हीं. हें सर्व तुला अर्पण होवो. ब्रह्मा-
र्पणमस्तु ॐ ब्रह्म० ॐ भुपतेनमः
ॐ भुवनपतेनमः ॐ भुतानामपतये-
नमः ॐ ब्रह्म०.

भोजनानंतर उपासना.

हे दयाळू पित्या मी तुझा अपरा-
धी दास असून तूं मला खाण्यापि-
ण्यास देऊन माझ्या आत्म्यास संतुष्ट
केलें याकरितां मी तुला हजारों नम-
स्कार करितों. हे ईश्वरा जसें तूं
मला खाण्यापिण्यास देऊन माझे
आत्म्यास संतुष्ट केलें असें तूं जग-

ताचे आत्म्यास संतुष्ट कर. ॐ ब्रह्म.

निर्जन उपासना

पूर्वी सांगितलेले समयीं ईश्वर-उपासना करावी. त्यानंतर हा मंत्र ह्मणून नमस्कार करावा. क महाम ब्रह्म निराकारण्यां । मामा ब्रह्म निराकारोत । निराकारण मस्तु ॥ १ ॥ यानंतर या मंत्राचा जप करावा. मंत्र॥ ॐ सयं शिव सुंदरं ॥ जपाचें विधान उत्तम ब्राह्मोज्ञानी याजपासून उपदेश करून घ्यावें. अनुभवसिद्ध ह्याजपासून चित्तशुद्धि आणि ईश्वरी पवित्र तेज याचें ज्ञान उत्तम होतें.

ब्रह्मस्मृति उपासना विधीनिरोपणं नाम त्रयोदश अध्याय समाप्त ब्रह्मार्पणमस्तु ॐ ब्रह्म०.

ॐ तत्सत ब्रह्मणेनमः

# अध्याय १४.

उपासना उन्नती.

जगदीश्वरा तूं माझा रक्षक हो. कारण तुजवर माझा भरंवसा आहे. माझा ईश्वर तूंच आहेस असें तूं ईश्वरास ह्मणतोस. माझे उत्तम कर्मापासून तुला कांहींच गरज नाहीं. ब्रह्म आज्ञा. पृथ्वीवरील ज्ञानी लोकांस आणि सत्यलोकांस ज्यापासून माझा सर्व आनंद आहे ते संकटांत रहातील. विनंती ॥ जे अन्य वस्तूचे पुजक आहेत त्यांचे लेकांस दाखविण्याचे यज्ञांतील रक्तश्राव होणारे बळी मी आर्पण करणार नाहीं. इतकेंच नाहीं तर मी आपले मुखानें त्यांचे उच्चार करणार नाहीं. माझे वतनदारीचा हिस्सा ब्रह्म आहे. मा-

झे प्राणाचा आणि आत्म्याचा संरक्षक तूं आहेस. उत्तम घरें मजकरितां सिद्ध केलीं गेलीं आहेत. माझी मीरास उत्तम आहे. मी ब्रह्मासच मुबारक आनंदकारक, ह्मणेन ज्यानें मला उपदेश केला, ज्यानें मला मूर्खास ज्ञान दिलें, माझी दृष्टी त्या ब्रह्म याजवर आहे. कारण कीं, तो माझा उजवा नित्य हस्त आहे. मला कधीं हरकत होणार नाहीं. याजकरितां माझा जीव आनंदांत आहे. माझी इच्छा लडीवाळपणांत आहे. माझें शरीर भरवशांत चईन करील. कारण तूं माझे जीवास समाधींत राहूं देणार नाहींस. तूं आपले दासास सडूं देणार नाहींस. तूं मला आयुष्याचा मार्ग दाखवशील. तुझे समक्ष आनंदच आनंद आहे. तुझे सत्य

हातांस शेवटपर्यंत संतोष आहे. ॐ तथास्तु.

पद.

सतत पडूंदे प्रकाश ॥ दयेचा मजवरी पडूंदे प्रकाश ॥ ध्रु० ॥ मन विषयीं कां गुंतुनि गेलें, कां त्या धरी भवपाश ॥ १ ॥ दये०॥ प्रभु तव चरणा, त्यागुनि जातां, निश्चित होईल नाश ॥ २ ॥ दये ॥ इहलोक सौख्यें, मजशीं न मिळतां, न कधीं मी होई निराश ॥ ३ ॥ दये० ॥ अविनाश सौख्यें, तुजपाशीं भोगूं, ऐसाचि मनीं अभिलाष ॥ ४ ॥ दये० ॥

अभंग.

मुखीं नाम हातीं मोक्ष ॥ ऐसी साक्ष बहुतांची ॥ १ ॥ ध्रु० ॥ ब्रम्हुचा माल खरा ॥ तूर्तातूर्त

वस्तुशीं ॥ २ ॥ भस्म दंड न लागे काठी ॥ तीर्थी आटीं भ्रमण ॥ ३ ॥ तुकाह्मणें आडकाठी ॥ नाहीं भेटी देवाचे ॥ ४ ॥

अभंग.

आग लागो तया सुखा ॥ जेणें हारी न ये मुखा ॥ १ ॥ ध्रु० ॥ मज होत कां विपत्ती ॥ हारी राहो चित्तीं ॥ २ ॥ जळो तें समूळ ॥ धनसंपत्ति उत्तम कुळ ॥ ३ ॥ तुकाह्मणें देवा ॥ जेणें घडो तुझी सेवा ॥ ४ ॥

उपासना ईश्वरस्तुति.

हे पूर्ण ब्रह्म सत्यास ऐक. माझे फिर्यादीवर लक्ष दे. आणि माझे प्रार्थनेवर जी माझे दिनाचे मुखांतून निघत आहे तिकडेस तुझा पवित्र कर्ण दे. मजविषयीं आज्ञा तुझे प-

वित्रस्थानांतून निघो आणि तुझी पवित्र दृष्टी सत्यत्वांस पाहो. तूं माझे भक्तीस पाहिलेंस, रात्रीचे समयांत मजजवळ येऊन माझी परीक्षा केलीस. मजमध्यें कांहीं मिळालें नाहीं, मी आपले मनांत खास नेम केला आहे कीं, माझे मुखांतून वाईट शब्द न निघो. जगाचे कृतीस पाहून तुझ्या पवित्र आज्ञेवर भरंवसा ठेवला. मला ताप देणारे मार्गावर लक्ष ठेव. मला तुझ्या मार्गांत चालतांना आश्रय दे. कारण माझा पाय तुझे मार्गांतून न फिरो. मी तुजलाच हाक मारिली कारण तूंच माझें ऐकशील. हे देवाधिदेवा मजकडेस लक्ष दे आणि माझी विनंती ऐक. तुझी अनंतकरुणा मजवर कर. आपले दासाचें रक्षण करणारा तुझे सव्य हस्तानें मला

माझे शत्रुपासून सोडीव. हे प्रभु नेत्रास जशी पापणी रक्षण करती तद्वत तूं माझें रक्षण कर. मला तुझे पवित्र चरणाचे आश्रयाखालीं ठेव. त्या दूरबुद्धी पासून जे मजवर जुलूम करितात आणि माझे जीवाचे जे शत्रू आहेत ज्यानीं मला वेष्टिलें आहे, त्यांचे नेत्रांवर चरबीचें अच्छादन आहे तेच आपले मुखानें महत्वाचे शब्द बोलतात. त्यांनीं आह्मांस पदोपदीं वेष्टिलें आहे. कारण आह्मास जमीनदोस्त करावें याकरितां आपले डोळे आह्माकडे लावले आहेत. हे प्रभु तूं जागृत होऊन त्यांस मना कर आणि दूर कर. माझे जीवास त्या दुष्टांपासून तुझ्या खड्गानें सोडीव. त्या लोकांपासून ज्यांची दृष्टी याच जगांत आहे. हे पूर्णब्रह्म तुझा हस्त

दुर्नीयेचे लोकांवर आहे ज्यांचीं पोटें तूं आपल्या गुप्त पदार्थानें भरलीं त्यांस तुंवंश देऊन संतोषी केलें. आणि ते आपले बाकीचें द्रव्य आपले मुलांबाळांकरितां सोडून जातात. परंतु मी जो आहें तो तुझें पवित्रमुख सत्यत्वांत पाहीन आणि मी तुझे पवित्र तेजास पाहून जागृत होईन त्याच समयीं आनंद पावेन.

पद.

भजन करा श्री जग्दुरुचें । जाईल जन्म वायारे ॥ धु० ॥ सत्वर येऊनि प्रेमे त्याच्या ॥ घाला मिठी दृढ पायांरे ॥ निर्मळ करूनि मन हें आपुलें ॥ या सन्नाधि प्रभु रायारे ॥ १ ॥ सत्सुख त्याच्या सन्निध लाभे ॥ तेथें मग कां नायारे ॥ कामशरांनीं व्या-

